चिमूटभर माती म्हणे,
मी होइन पणती
टीचभर कापूस म्हणे,
मी होइन वाती
थेंबभर तेल म्हणे,
मी होइन साथी
ठिणगी पेटताच फुलतील,
नव्या ज्योती
अशीच यासारखी फुलत
जावी आपली नाती.!



मराठी बोली
आवाज मराठी माणसाचा

!! दीपावलीच्या हार्दिक शुभेच्छा !!

प्रणम्य शिरसा देवं गौरी पुत्रम विनायकम
भक्तावासं स्मरेनित्यम आयुषः कामार्थ सिद्धये



मराठी बोली.कॉम

आवाज मराठी माणसाचा

या दिवाळीला आपल्या नातेवाइकांना फराळाबरोबर पुस्तके भेट दया.

आणि साजरी करा पुस्तकांची शुभ दीपावली..

सर्व पुस्तकांवर १० टक्के सवलत.

६०० रुपयांवरील खरेदीवर मोफत घरपोच सेवा.



हीच दीपावली आणि नवीन वर्ष
आपणा सर्वांना सुखसमृद्धीचे,
भरभराटीचे, आनंदाचे, प्रगतीचे
आणि आरोग्याचे जावो
हीच परमेश्वरचरणी प्रार्थना...

मराठीबोली परिवार



# मराठीबोली

मुख्य संपादक
**स्वप्नील समेळ**

मुखपृष्ठ रचना
**प्रशांत वेदक**

मुखपृष्ट चित्रकार
**शीतल राउत**

पत्रव्यवहार
social@marathiboli.in

**लेखक**
राजेश लोंढे
समिधा
शीतल जोशी
मिलिंद डोंबाळे(देशमुख)
पांडुरंग वाघमोडे
माधव भोळे
सागर
कट्टा ऑनलाईन
तात्या
संतोष सावंत
अनंत
समीर येरोळकर
अनन्या
चंद्रसेन सिध्दार्थ जाधव



मित्रहो ,

**दीपावलीच्या हार्दिक शुभेच्छा!**

दीपावली म्हणजे दीपोत्सव म्हणजेच उत्सव. सर्वांना आवडणारा आणि मनमुराद खरेदी, चविष्ट फराळाचा स्वाद घेण्याची पर्वणी. अश्विन वद्य अमावस्येला रात्री लक्ष्मी पूजन करतात. लक्ष्मी सौदर्य, प्रेमाचे, धनाचे, वैभवाचे प्रतीक आहे. संयमपूर्ण धन कमावण्याची सुबुद्धी मिळावी या साठी ही जा असते. लक्ष्मी चंचल असते व जेथे स्वच्छता, मांगल्य प्रकाश असतो तेथे ती निवास करते. या समजुतीमुळे दीपावलीच्या काळात अनेक दिव्यांची रोषणाई घरात – अंगणात करण्यात येते. याच काळात पाडव्याच्या दिवशी साडेतीन मुहूर्तातील एक मुहूर्त असतो त्यामुळे अनेक नवीन प्रकल्प या मुहूर्ताला सुरु करण्यात येतात. अशा या दिवाळीच्या निमित्ताने मिळणाऱ्या शुभ मुहूर्ताचे निमित्त करून आपणही आपल्या व्यक्तिमत्वाच्या श्रीमंतीसाठी करावयाच्या प्रयत्नांचा शुभ मुहूर्त करायला काय हरकत आहे.

पृथ्वीतलावरील प्रत्येक माणसाचे मन सृजनशील, जिज्ञासू असते. त्यांच्या मनात आत्म्यांचा दिवा त्याच्या मानसिक गाभाऱ्यात सदैव तेवत असतो. अशा या मनाला शिक्षण सहेतू दिले तर त्यातून सृजन विचार सुचतात. या विचारांतून अलौकिक ज्ञान प्राप्त होते. ज्ञान आणि कर्तृत्वाच्या जोरावर अशी ज्ञानी माणसे देशाला समृद्ध करतात. अशा सृजन विचारांची माणसे या देशामध्ये अधिकाधिक निर्माण होण्याची आणि त्यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न करण्याची गरज आहे. सृजनशील विचारांसाठी गरज असते ती चांगल्या साहित्याची, मराठी भाषेमध्ये असे साहित्य अमर्यादित आहे. पण मर्यादा आहे ती त्या साहित्याच्या प्रसारावर. पाच वर्षांपूर्वी मराठी भाषेतील नावाजलेली पुस्तके फक्त मुंबई किंवा पुणे अशा निवडक शहरांमधील निवडक दुकानांमध्ये मिळायची, पण आज पाहिजे ते पुस्तक वाचकाच्या हातात अगदी सहज पोहचते . मराठीबोली या संस्थेची निर्मिती याच एका ध्येयासाठी ११ नोव्हेंबर २०११ रोजी करण्यात आली आणि गेली ५ वर्षे मराठीबोली आपले काम ना नफा ना तोटा या तत्वावर करत आहे. आज मराठीबोलीचा पहिला दिवाळीअंक आपल्यासमोर ठेवताना मला अत्यंत आनंद होत आहे. मराठीबोली यापुढेही अशाच अनेक माध्यमातून मराठीबोली मराठी वाचकांना मराठी भाषेतील सुंदर साहित्याची ओळख करून देत राहील. नवोदित मराठी लेखकांना संधी देणे, मराठी उद्योजकांना त्यांच्या उद्योगामध्ये मोफत मार्गदर्शन करणे, मराठी ब्लॉग लेखकांना सर्व तांत्रिक मदत करणे अशी अनेक कामे मराठीबोली गेल्या ५ वर्षांपासून करत आहे. जगातील सर्व अद्ययावत तंत्रज्ञानाचे शिक्षण आपल्या मातृभाषेत मिळावे आणि कोणताही मराठी विद्यार्थी फक्त भाषेच्या अडसरामुळे मागे राहू नये, म्हणून मराठीबोली लवकरच जगातील सर्व तंत्रज्ञानाची माहिती मराठीतून पुरवेल आणि ती सुद्धा पूर्णपणे मोफत. आपला आशीर्वाद फक्त सदैव आमच्या सोबत राहू दे.

उद्योजकता, नवोदितांच्या कविता, कथा , विविध विषयांवर आधारित लेख, मराठीतून तंत्रज्ञानाची ओळख अशा विविधांगी विषयांवर प्रबोधन करणारा हा दिवाळी अंक निच्छितच वाचकांच्या या अंकाकडून असलेल्या अपेक्षा पूर्ण करेल. मराठीबोलीचे वाचक, लेखक, जाहिरातदार, मराठीबोलीचे पाठीराखे, पुरस्कर्ते या सर्वांना दीपावलीच्या हार्दिक शुभेच्छा.

LANDMARC FILMS

ज्या बारिक नसतात
त्या **जाडच** असतात




# वजनदार

WRITTEN & DIRECTED BY **SACHIN KUNDALKAR** PRODUCED BY **VIDHI KASLIWAL**

DIRECTOR OF PHOTOGRAPHY MILIND JOG EDITOR GORAKSHNATH SOUND DESIGNER ANITA KUSHWAHA
MUSIC AVINASH - VISHWAJEET LYRICS OMKAR KULKARNI, VISHWAJEET BACKGROUND MUSIC DEBARPITO SAHA
CHOREOGRAPHER MANSI AGGARWAL ART DIRECTOR ABHISHEK REDKAR COSTUME DESIGNER AMIT DIVEKAR

/Vazandar /landmarcfilms /landmarcfilms /landmarcfilms /landmarcfilms

www.landmarcfilms.com

# अंतरंग

## कविता



## तंत्रज्ञान



## लेख / कथा



"मी एके दिवशी हे जग सोडून जाणार आहे" या सत्याने मोठमोठे निर्णय घेताना नेहमीच मला मदत केली आहे. कारण मरणाच्या दारात जवळपास सर्वच गोष्टी, सर्व इच्छा-अपेक्षा, अभिमान, बंधनात अडकण्याची आणि पराभवाची भीती सर्वच नष्ट होतात. तुमच्या कडे काही गमावण्यासारखे आहे या पाशातून मुक्त होण्यासाठी तुम्ही एक दिवस मरणार आहात हे लक्षात ठेवणे हा सर्वात सोपा मार्ग आहे.

स्टीव जॉब्स

भग्न स्वप्नांच्या तुकड्यांना कवटाळून बसण्यासाठी मनुष्य जन्माला आलेला नाही! मानवाचे मन केवळ भूतकाळाच्या साखळदंडानी करकचून बांधून ठेवता येत नाही. त्याला भविष्याच्या गरुड पंखांच वरदानही लाभलेलं आहे. एखाद स्वप्न पाहणं, ते फुलविण, ते सत्यसृष्टीत उतरावं  म्हणून धडपडण, त्या  धडपडीतला आनंद लुटण आणि दुर्दैवाने ते स्वप्न जरी भंग पावलं तरी त्याच्या तुकड्यांवरून रक्ताळलेल्या पायांनी दुसर्या स्वप्नामागनं धावण , हा मानवी मनाचा धर्म आहे. मनुष्याच्या जीवनाला अर्थ येतो तो यामुळं.



वि. स . खांडेकर



# एक कवीता तुझ्यासाठी

हे रसीकराजा
एक कवीता तुझ्यासाठी
तुझ्यातल्या त्या
रसीकते साठी

तू वाचतोस
म्हणून मी लिहीतो
त्या प्रेमासाठी
लेखणी झिजवीतो

आनंदाचा एक क्षण तुला मिळावा
एवढीच माझी एक आशा असते
त्या एका क्षणासाठीच
माझे जगणे असते

- राजेश लोंढे

# जाणीव



नोकरी निमित्त माझा रोजचाच ट्रेन चा प्रवास ...!! मुंबईच्या लोकल ट्रेन्सला कधीही जा खच्चून भरून वहात असतात ...!! बायकांसाठी तर मोजून तीन डबे ...!! आणि फर्स्ट क्लासचे डबे म्हणजे "एक किचन" नाव पण अगदी परफेक्ट दिले आहे ... ! या डब्यात मोजून तेरा सीट असतात ...!! त्यामध्ये चौथी सीट नो अलाउड ...! अश्या ह्या किचन मध्ये एका वेळी आम्ही पन्नास बायका घुसतो ....!! एकमेकींच्या पायावर पाय देत !! खांद्याला खांदा भिडवून शाब्दिक चकमकी घडवून ... प्रवासाचा महामेरु सर करीत घराचा गड गाठत असतो ...!!

त्यादिवशी नेहमी प्रमाणे ट्रेनला गर्दी होतीच ... पण जरा जास्तच होती ...!! ट्रेनमध्ये चढण्याचे दोन प्रयत्न फेल गेले ...! पण मला काही डब्यात घुसता आले नाही !! माझ्यासारखी डब्यात चढण्याची धडपड रिटायरमेंटला आलेल्या अजुन दोन काकू करीत होत्या . शेवटी त्यातील एक जण म्हणाली " आज काय मेलं आपल्याला गाडीत चढ़ता येईल असे वाटत नाही ...!" लेडीज फर्स्ट क्लास ला लागूनच "अपंगांचा " डबा असतो ... ! तुलनेने त्यामध्ये एव्हढी गर्दी नसते . लगेचच दूसऱ्या काकू म्हणल्याच चला गं आपण त्याच डब्यात चढू ... मी मात्र काकू काकू करायला लागले ... कारण त्यांचं ठीक होतं । त्या दोघी वयस्कर होत्या ... पण मी मेली तरुण तुर्क त्यांच्या बरोबर अपंगांच्या डब्यात चढायचे म्हणजे फारच गिल्टी वाटत होते ...!! गिल्टी वाटण्यापेक्षा भितीच जास्त ...!! पण शेवटी मनाचा हिय्या करून एक काकू पुढे आणि दुसऱ्या माझ्या मागे . अश्या एकदाच्या "त्या " डब्यात चढ़लो ... पण आम्ही जेमतेम आत घुसु शकलो होतो ... माझ्या मागच्या काकू मागून बोंबलायला लागल्या " अगं जरा पुढे सरका मी दाराशी लटकतेय ... ! पण माझ्या पुढच्या काकू का कोण जाणे पण पुढे काही सरकतच नव्हत्या ...!! " काय झाले काकू पुढे सरका नं ..." अगं कशी सरकू ......... माझ्या पुढे खाली एकजण बसला आहे ... !" खाली बसला आहे ......... ?" माझी सटकलीच ... मागे त्या काकू

लटकतायत आणि हा पठ्या खाली बसलाय ... !! काय माणुसकी बिणुसकी आहे की नाही ...? " ओ भाऊ जरा आत सरको ... दिखता नही लोक लटक रहे है ...! थोड़ी बी माणुसकी नहीं है ... !! माझ्या मराठी मिश्रित हिंदीला त्याने जोरात धक्का दिला " ओ मॅडम मै "अपंग " हूँ दिखता नहीं ...? मला काय बोलावे सुचलेच नाही त्या गर्दीच्या भाऊगर्दीत मी अपंगांच्या डब्यात घुसून हुशा -या मारत होते ...!!! मागच्या काकूंचा आवाज आपोआपच बंद झाला ...!!

कुठले तरी स्टेशन आले ( गर्दीत बाहेरचे काहीच समजत नव्हते ) गर्दी थोड़ी कमी झाली आम्ही लगेचच आत सरकलो ... तेव्हढ्यात डब्यातली माझ्या जवळची एक बाई माझ्याकडे पायपासून वरपर्यंत पाहत होती । तिच्या नजरेला मी वाचवत होते । तेव्हढ्यात " तुमचं काय मोडलय ...? " तिच्या त्या अनपेक्षित प्रश्नाला काय उत्तर दयावं ? काही नाही मोडलं ... काही मोडु नये नं म्हणून इथं आलो ! माझ्या बरोबरच्या काकू आधीच तत्परतेने आपला डावा हात खाली वर करून माझ्या हातात रॉड घातला आहे बरं ...!! विचारणारी बाई पण धड़ धाकटच दिसत होती । मी पण लगेच सूडाने विचारले तुमचे काय मोडलय ...? तिने तिच्या जवळ बसलेल्या तिच्या अपंग मुलाकडे बोट दाखवले ... ! ह्याला पाय नाहीत ...!! मी पुन्हा एकदा पार ख़जिल खल्लास !!

मी सुन्न दारात उभी राहीले । डब्यात सभोवर नजर फिरवली . प्रत्येक सीट वर कुणीतरी आंधळे बसले होते, कुणाला पाय नव्हते , तर कुणाला हात नव्हते !! कुणाच्या डोक्यावर केस नव्हते ते फडकी गुंडाळलेली कॅन्सर पेशंट होते ...!! ते माणसाच्या जीवनाचे वास्तव चित्र होते ...!! त्या तश्या अवस्थेत प्रत्येकजण जगण्यासाठी धडपडत होता ...!! डबाभर ते दुःख असले तरी मला ते जगातील दुःखाची जाणीव करून गेले ...!! माझ्या पूर्णत्वाची जाणीव करून देणारा तो अपंगाचा डबा त्याने मला माझा आरसा दाखवला !! छोट्या छोट्या अडचणींना दुःख समजून कवटाळायचे आणि मिळालेल्या ह्या पूर्णत्वाला नकारुन सुखी जीवनापासून स्वतःला दूर ठेवायचे ...!! मला हे सत्य माहित नव्हते असे नाही पण आज मला सत्याची प्रखर जाणीव झाली ...!!

माझे स्टेशन आले मी उतरले आणि खटकन माझी चप्पल तुटली मी तीला तिथेच सोडले आणि माझ्या मोकळ्या पायांनी चालायला लागले न लाजता ...!!

" समिधा "

गरुडा इतके उंच उडता येत नाही म्हणून चिमणी कधीच उडायचे सोडत नाही.. स्वतःवर विश्वास ठेवा.

# आभाळातलं सोनं

आभाळातलं सोनं
दे रे देवा आता
नको पाहू वाट
होईल माझा अंत.

मध्यानीचा सूर्य
मावळती आला
पाण्यासाठी दाहीदिशा
ओलांडून झाल्या.

संपून गेल्या
सगळ्या वाटा
थकून माझा
टेकला माथा .

तुला कशाशीच
नाही पर्वा-,
सकाळ संध्याकाळ
भ्रांत येगळीच आम्हा.

सगळीकडे गडद
दुष्काळी छाया
थांबव सारी
भटकंती आता.

फिरून फिरून
कंबरडे मोडले
प्यायचे दोन घोट
मिळेनासे झाले.

गावातील आड विहिरी
कोरडे झाले
घरट्यातील पक्षी
दूरदूर निघून गेले.

घारीसम नजर
दूरवर कश्यासाठी?
पायात भिंगरी
घोटभर पाण्यासाठी...

हा खेळ देवा
तुझाच आहे
आभाळातल्या सोन्याचं
घमशान वाजू दे रे.

थकून गेला
जीव माझा
हे बघ देवा
विश्रांतीच आता.

तोंडात पडणारे
हातातून जात होते
फुलू दे शेती मळे
शेतातलं सोनं थोडं हातात दे रे...

.........पांडुरंग वाघमोडे,जत





# हिरकणी बुरुजाची सत्यकथा

छत्रपती शिवाजी महाराजांनी मराठी साम्राज्याच्या राजधानीसाठी किल्ले रायगड उभारला. १६७४ साली महाराजांचा राज्याभिषेक सोहळा रायगडावर संपन्न झाला. सह्याद्रीच्या कुशीत वसलेल्या ह्या किल्ल्याची बांधनी सुरक्षेच्या दृष्टीने अतिशय चांगली होती. ४४०० फुट उंची असलेल्या ह्या गडावर दरवाज्यांखेरीज कोणताही येण्याजाण्याचा मार्ग नव्हता. असे म्हंटले जायचे की – 'रायगडाचे दरवाजे बंद झाले की, खालून वर येईल ती फक्त हवा आणि वरून खाली जाईल ते फक्त पाणी'. पण ह्या गोष्टीला अपवाद ठरणारी एक स्त्री म्हणजेच – 'हिरकणी'

किल्ले रायगडाच्या खाली काही अंतरावर वाकुसरे (वाळूसरे) नावाचे एक छोटेसे गाव होते. त्या गावात एक धनगर व्यक्तीचे कुटुंब राहत होते. घरात त्या व्यक्ती समवेत त्याची आई, बायको हिरा व त्यांचे एक तान्हे बाळ राहत असे. दूध विकून मिळणाऱ्या पैश्यातून ते कुटुंबाचा उदरनिर्वाह करत असत. त्याची बायको रोज सकाळी गडावरती दूध विकण्यास जात असे. एके दिवशी रोजच्याप्रमाणे हिरा गडावर दूध विकण्यास गेली, पण तिला त्या दिवशी काहीएक कारणाने दरवाजापर्यंत पोहोचण्यास उशीर झाला. ती गडाच्या दरवाजांजवळ आली, पण पाहते तर काय दरवाजे बंद झालेले होते. गडकऱ्यांना तिने फार विनंती केली, पण त्यांनी दरवाजे उघडण्यास नकार दिला. कारण सकाळी उघडलेले दरवाजे सूर्यास्तानंतर बंद झाले कि, ते पुन्हा दुसऱ्या दिवशी सकाळीच उघडत असत. छत्रपतींची ही आज्ञा सर्वांना लागू होती. कोणालाही त्यासाठी मुभा नसे. पण हिराला आपल्या तान्ह्या बाळाची चिंता लागली होती. आईवाचून ते तान्हे बाळ रात्रभर कसे राहील,

ह्या विचाराने त्या आईची चिंता वाढतच चालली. ह्या विचारातच हिराने किल्ल्याच्या कड्यावरून खाली उतरण्याचा निर्णय घेतला. अंधारात कड्यावरून खाली जाणे म्हणजे जीव पणाला लावण्याच्या बरोबरीचे होते. कारण सर्वत्र खोल दऱ्या, दाट झाडे-झुडपे आणि त्यात अंधार. पण बाळाच्या प्रेमापोटी ह्या मातेने हा निर्णय घेतला. गडाच्या कड्यांचे निरीक्षण केले. एका कड्यावर येऊन पोहोचली आणि त्याच कड्यावरून खाली उतरली. खाली पोहोचूपर्यंत मात्र सभोवतालच्या झाडा-झुडपांमुळे अंगावर अनेक ठिकाणी ओरबडल्याने रक्त आलेले होते. त्याच अवस्थेत गड उतरून ती आई आपल्या घरी परतली. घरी परतताच पहिल्यांदा त्या आईने आपल्या बाळाला कुशीत घेतले. बाळाच्या दर्शनाने त्या आईला जो आनंद झाला, तो मात्र जखमांच्या वेदनेपेक्षा कितीतरी पटीने जास्त होता.

ही घडलेली गोष्ट जेव्हा महाराजांना कळली, तेव्हा ते अत्यंत अश्यर्यचकित झाले. कारण शत्रूच्या सैन्यालाही दरवाजातून येण्या-जाण्या शिवाय मार्ग उपलब्ध नसणाऱ्या रायगडावरून एक स्त्री खाली कशी पोहोचली. हा प्रश्न महाराजांसहित सर्वांनाच अनुत्तरीत होता. महाराजांनी हिराला गडावर बोलावण्यास सांगितले. हिरा गडावर आली, ती आल्यानंतर महाराजांनी तिला ह्या सर्व घटनेविषयी विचारले असता, हिरकणीने महाराजांना घडलेला सर्व घटनाक्रम सांगितला व आपल्या तान्ह्या बाळाला भेटण्यासाठी हा एकच मार्ग उपलब्ध होता असे सांगितले. हे ऐकून त्या शूर मातेचा महाराजांनी साडी-चोळी देऊन सन्मान तर केलाच पण ज्या कड्यावरून ती खाली उतरली त्या कड्यावर आईच्या प्रेमाची साक्ष म्हणून एक बुरुज बांधण्यात आला. तो बुरुज म्हणजेच रायगडावरील 'हिरकणी बुरुज'. त्याचबरोबर ती राहत असलेल्या गावाला तिचे नाव देण्यात आले. ते गाव म्हणजेच रायगडाजवळील 'हिरकणीवाडी'. सध्या रायगडावर जाण्या-येण्यासाठी बनवण्यात आलेला रोपवे (Ropeway) हा त्याच 'हिरकणीवाडी'तून उपलब्ध करून देण्यात आला आहे.

हिरकणीवर उपलब्ध असलेली प्रसिद्ध जुनी कविता येथे देत आहे. पण प्रयत्न करूनही सदर कवितेच्या कवीचे नाव समजू शकले नाही. ते जे कोणी थोर गृहस्थ असतील त्यांच्याप्रती कृतज्ञता व्यक्त करत ती कविता येथे देत आहे.

रायगडावर राजधानी ती होती शिवरायांची ।
कथा सांगतो ऐका तेथील हिरकणी बुरुजाची ।

वसले होते गाव तळाशी वाकुसरे या नावाचे ।
राहात होते कुटुंब तेथे गरीब धनगर गवळ्याचे ।

आई बायको तान्हा मुलगा कुटुंब होते छोटेसे ।
शोभत होते हिरा नाव त्या तडफदार घरवालीचे ।

सांज सकाळी हिरा जातसे दूध घेऊनी गडावरती ।
चालत होती गुजराण त्या नेकीच्या धंध्यावरती ।

एके दिवशी दूध घालिता हिरा क्षणभर विसावली ।
ध्यानी आले नाही तिच्या कधी सांज टळूनी गेली ।

सूर्यदेव मावळता झाले बंद गडाचे दरवाजे ।
मनात भ्याली हिरा म्हणाली घरी बाळ तान्हे माझे ।

हात जोडूनी करी विनवणी म्हणे जाऊद्याखाली मला ।
गडकरी म्हणती नाही आज्ञा शिवरायांची आम्हाला ।

बाळाच्या आठवे झाली माय माउली वेडिपीसी ।
कडा उतरूनी धावत जाऊनी बाळाला ती घेइ कुषी ।

अतुलनीय हे धाडस पाहुनी महाराज स्तंभित झाले ।
साडी चोळी हिरास देऊनी प्रेमे सन्मानित केले ।

कड्यावरी त्या बुरूज बांधला साक्ष आईच्या प्रेमाची ।
ऐकू येते कथा अजुनी अशी हिरकणी बुरूजाची ।

हिरकणीची ही शौर्यगाथा आजही रायगडावर सांगितली जाते आणि तो हिरकणी-बुरुज आईच्या प्रेमाची साक्ष देत आजही रायगडावर तटस्थपणे उभा आहे. एका शूर मातेची कथा सर्वांपर्यंत पोहोचावी एवढाच हा लेख लिहिण्यामागील स्वार्थ...

धन्यवाद
मिलिंद डोंबाळे (देशमुख)

# भेट

मातीच्या भेटीची
ओढ नभाला
गर्जतो बेभाम
भेटण्या सखीला

काय वर्णावे
भेटीच्या प्रसंगाला
येई उधाण
मोहित मृद्गंधाला

उधळण रंगांची
शोभे नभाला
सप्तरंगी इंद्रधनू
उभा कमानीला

भेटीने दोघांच्या
उल्हास निसर्गाला
नवचैतन्य मिळे
साऱ्या जगाला

– मिलिंद डोंबाळे (देशमुख)

आयुष्याच्या पुस्तकात जेव्हा वाईट घटनांनी भरलेली पाने येतात, तेव्हा पुस्तक बंद न करता पान पलटून नवीन प्रकरणाला सुरुवात करा.

# कधी कधी माझं मला कळतच नाही

दोन दिवसांपासून डोळे चुरचुरत होते , मागच्यासारखे इन्फेक्शन झाले की काय ....? म्हणून लगेच दृष्टि हॉस्पिटलला फोन करून अपॉइंटमेंट घेऊन परस्पर ऑफिस सुटल्यावर जायचे नक्की झाले . संध्याकाळी ट्रेन मधून उतरले ती दवाखान्याच्या दिशेने जावे की नाही मी .... ? पण नाही ... माघी गणपती निमित्त आमच्याकडे मोठी जत्रा भरलेली आहे ...! जाता जाता ती जत्रा रस्त्यावरच! भरगच्च निरनिराळ्या वस्तु बांगड्या , क्लिपा , घरगुती उपयोगी सामान .... वा वा वा ... मी तर नुसती खुष नाही ते सर्व पाहुन काय काय घेऊ नी काय नाही .... वेडी झाले नुसती ...!! आणि मग झाली ना माझी शॉपिंग सुरु ...!! हे घे ... ते घे ...अहं तेही घे ... हं हे तर घेतलेच पाहीजे ! असं कसं हे पण घे ... ! माझी



शोप्पिंगबाई ऐकाला तयारच नाही ...! अरे भैया ये क्या ... कितना महाग देता है ...! दुकानवाला एक किंमत सांगायचं माग मी मोठी हुशारच आहे टाटा बिर्ला थाटात बिजिनेस डील करुन ती वस्तु अर्ध्या किंमतीत मिळवायची ...! (खरं तर त्याने मला उल्लू बनवलेले असणार ही शंका मध्येच चिमटा काढायची ... ) मग , हं भैयाजी मुझे पता है ये वस्तु इससेभी सस्ती होगी नं ! आणि तो भैया दात निकालके मस्त हसला की समजायचं ...! मै उल्लुही बनी थी ...!!! पण तोपर्यंत पुढच्याच्या पुढ्यातल्या पायपुसण्या मला खुणवायच्या (खुणवायच्या की मस्तच भुलवायच्या ...!!)

अशी खरेदी करत करत निघाले ... आणि समोर दवाखाना दिसला ...! दातांचा ... !! आणि मला माझ्या डोळ्यांची आठवण झाली.... खरेदिला जरा आवरले. पर्स तपासली फक्त सातशे रुपये उरलेले ...!! एव्हढयात माझा दवाखाना भागेल ...? मनात मोठी शंका आणि हातात हे येवढे सामान घेऊन हॉस्पिटल मध्ये प्रवेश केला! माझ्याकडे जुनी फाईलही नव्हती ! हं नाव बोला ... रिसेप्सनिस्ट माझ्या लहानग्या लेकीच्या मैत्रीणीची आईच होती . ( या

बाईंशी मी तिची मुलगी माझ्या लेकिला मारते म्हणून भांडले होते ) अश्या ओळखीचा फायदा घेऊन त्या बाईंना जरा कचरत , थोड़े चाचरत तोंडभर हसु आणत "तुम्ही आर्याची आई नां ? हो ! आणि त्या मस्त हसल्या ! मग मी धीर करून विचारलेच " किती फी होईल हो ?" त्यांनी न कळून ... भुवया ताणुन डोळे मोठे करून ... पाहिले . मग मी माझी शॉपिंग दाखवून ... अहो लक्षात नाही राहिले हो मी दवाखान्यात निघाले आहे ते ...! त्या सगळं समजून हसल्या .आणि विचारले , " किती उरलेत ? सातशे !! " मी उत्तर दिले, तीनशे कंसल्टिंग फी आणि औषधे होतील . " डोळे तपासून मी बाहेर पडले.

फाईलवर डॉक्टरांनी औषधे लिहून दिली होती. समोरच्या मेडिकल मध्ये गेले , हसून विचारले , औषधोका कितना होगा ? त्याने हिशोब केला . ढाईसो ...! म्हणजे आपले औषधांचेहि भागेल ! औषधे घेऊन परत निघाले ... जत्रेतून... मघाशी अर्धवट सोडलेली बरणी ... कपांचा सेट ... खूणवलंच त्यांनी !! गेले आणि उरलेले सगळे रुपये संपवले ... हा हा हा दिल खुष हो गया ... !! ढीगभर पिशव्या , पर्स , फाईल कशातरी सांभाळत , सावरत ... निघाले ... !! आता घरापर्यंत स्पेशल रिक्शा करावी लागणार ...!

आणि लक्षात आले रिक्शावाल्याला द्यायलाही पैसे उरले नव्हते ...! तेव्हढ्यात एक ट्रेन आली ... रिक्षेला गर्दी वाढायच्या आत रिक्शा पकडली . चार सीट मिळतात गर्दीत क्शावाल्यांना, मग आम्हा स्पेशल वाल्यांना कोण विचारतो ... ?

रिक्शा ज़रा पुढे आल्यावर हळूच अतीव मायने रिक्शावाल्या दादाला बोलले , भाऊ ... तुम्हाला माझ्या घराजवळ थोडवेळ थांबावे लागेल हं .... ! माझं वाक्यही धड़ पूर्ण होऊ न देता ... मी असं बोलते नाही तर तो उसळलाच ... ओ ... काय पण तुम्ही ताई ... आधी नाही का बोलायचं ... धंद्याच्या टाईमाला खोटी करता माझी ... ( तो सगळं न सांगताच समजला होता ! अशी त्याला उल्लू बनवणारी मी पहिलीच नसावी ) आता तुम्ही उतरणार कधी ... वर जाणार कधी ... आणि माझे पैसे देणार कधी ? फोन लावा फोन लावा घरी ... खाली आणून देतील कुणीतरी पैसं ! "भाऊ, माझं घर वर नाही खालीच आहे !" पण नाही ओ घरी कोण पण नाही ...!! पण मग तर तो जास्तच उसळला .... आणि त्याच्या दुप्पट

त्याची रिक्शा उसळायला लागली ! आदळत आपटत फास्ट मध्ये कशीतरी रिक्शा घराजवळ आली . दरम्यान मी इथून तिथून पर्स मध्ये हात घालून चिल्लर गोळा केली ... एखाद कागदी नोट ... तीस रुपये त्याच्या हातावर ठेवले ... " भाऊ " ! तुमचं नशीब चांगलं म्हणून मिळाले ...! आणि मग तो शेवटचा उसळला "काय वो तुमी ताई .... फुकाट टेन्शन वाडीवला माझा , तुमचाबी नशीब चांगला म्हणून यवस्थित पोचल्या घरी...!! ख्या ख्या ख्या ... !!! मी सेंकंदभर स्तब्धच ! , आणि मग मीपण ख्या ख्या ख्या ... करीत रिक्षेतुन सामाना सहीत उतरले...! खरंच कधी कधी माझं मला कळतच नाही ...!!!

"समिधा "



आपलं भाग्य आपल्याच हातात असत, दुसऱ्या कोणाच्या नाही. जर आपल्याला स्वतःपद्धल खात्री असेल की, नि हे नक्की करू शकतो, तर तुम्हाला यश मिळणारच. एकदा मनाने निश्चय केला तर ते यश खेचून आणू शकते.

धीरूभाई अंबानी

# ओढ

नकळत लागते सखे
मला फक्त तुझी ओढ
तुला पाहण्यासाठीसाठीच चालु असते
माझ्या नजरेची चढा-ओढ

कधी जवळ वाटशी तु
दुर असुन ही माझ्या
कीती मनऊ मी तुला
आठवणी येतात गं तुझ्या

तुझी प्रित ही सखे
लाव्ण्याहूनही कीती छान
तुला पाहिले की सखे
लवलवते माझ्या मनाचे पान

तुझी ही अनमोल गोडी
मनाला माझ्या छळ्ते
तु दुर असलीस की फक्त
तुझीच ओढ लागते

ओढ ही तुझी मला सखे
प्राणाहूनही प्रिय वाटते
कारण तुझ्याचसाठी ती
आजही जीव अर्पित करते

अशी ही सखे मला
तुझी ओढ जीवा लागते
तुझी ओढ जीवा लागते
तुझी ओढ जीवा लागते ........

चंद्रसेन सिध्दार्थ जाधव

# साम्राज्यवाद आणि भारत

भारतावर आजपर्यंत अनेक परकीय आक्रमणे झाली. जगतजेत्या सिकंदरला (ख्रि.पु. ३५६) सुद्धा भारतावर आक्रमण करण्याचा मोह आवरला नाही कारण त्या काळी भारतात घरोघरी सोन्याचा धूर निघत होता. त्या नंतर इ वि स १२०६ मध्ये मोहमद घोरी ने सुरवात केलेल्या तुर्की इस्लामिक राजवटी पासून ते १५९९ मधील इस्ट इंडिया कंपनी च्या आगमनापर्यंत, , शिवशाही चा १६६० ते १८१८ चा पेशवाईचा काळ सोडला तर, पुढे ब्रिटीश राजवटीचा १९४७ मध्ये अस्त होईपर्यंत आपण परकीय आक्रमणा खाली होतो. भारतातील बौद्ध धर्माने देशाच्या हद्दी ओलांडल्या, परकियांच्या मनावर राज्य केले पण त्यांच्यावर राज्य करण्याचा मोह भारतीय राजांना झाला नाही. नाही म्हणायला दक्षिणेकडील राजे श्रीलंका, थाईलंड, ब्रह्मदेश, मालदीव, मलेशिया या सारख्या जवळच्या देशात गेले आणि तेथेच स्थाईक झाले.

आता लढायांचा आणि आक्रमणाचा काळ गेला आहे असे नाही पण त्याचे स्वरूप बदलले आहे. आता तंत्रज्ञानाने आणि व्यापाराने जग जिंकायचे आणि सबंध जगावर राज्य करायचे, सबंध जगाची संपत्ती नवीन नवीन तंत्रज्ञान आणि उत्पादने यांचे सहायाने आपल्या ताब्यात घ्यायची हि पद्धत रूढ होत चालली आहे. याला आपण आर्थिक साम्राज्यवाद म्हणू शकाल. पूर्वी शिवाजी महाराजांनी सुद्धा युद्धासाठी अनेक वेळा दारुगोळा आणि तोफा फिरांग्यांकडून विकत



घेतल्याचे वृत्त आहे.  या बाबतीत अमेरिका; युरोप आणि काही पुढारलेले देश आघाडीवर आहेत. सबंध जगाचा व्यापार आपल्या ताब्यात घेण्याच्या द्रुष्टीने या पुढारलेल्या देशांनी जागतिक व्यापार परिषदेची स्थापना केली त्या मध्ये व्यापारावरील निर्बंध उठवून मुक्त व्यापाराला प्रोत्साहन देण्याच्या गोंडस नावाखाली अनेक नवीन करार झाले. अर्थातच बळी तो कान पिळी या नियमाप्रमाणे त्या देशातील कंपन्या आपापली उत्पादने आणि सेवा यांची दुकाने भारतात थाटायला लागल्या. आमची  तरुणाई त्या मध्ये रात्रंदिवस इमानदारीत काम करायला लागली (पूर्वी आमचे मजूर ब्रिटीशांच्या उसाच्या मळ्यात आणि कारखान्यात जगभर काम करायचे).

आजपर्यंत अनेक परकीय औषध कंपन्यांनी तयार केलेल्या औषधी उत्पादनांवर आपण स्वामित्व देत होतो पण आता जागतिक व्यापार परिषदेमार्फत झालेल्या सुधारणांमुळे आपण स्वस्त जेनेरिक औषधे (ज्यांची पेटंट संपलेली आहेत. साधारण पणे एक पेटंट १७ वर्ष चालते),  जी भारतीय कंपन्या दुसऱ्याचा फॉर्म्युला वापरून निर्माण करतात, बिना स्वामित्व खरेदी करू शकतो. जर हे नसते तर आणखी एका साम्राज्यवादी गोष्टीला आपण बळी पडलो असतो कारण  भारतीय कंपन्या स्वताहून अशी फारच थोडी औषधे नव निर्मित करतात.

अर्थातच हि सूट देताना परदेशियानी अनेक इतर फायदे उठवले आहेत जसे सर्व परकीय उत्पादनाची कस्टम डूटी कमी करणे, परकीय ब्यांका , इन्सुरन्स कंपन्या यांना व्यापार करण्यास परवानगी देणे, शेती मालावर सबसिडी कमी करणे जेणे करून त्यांचा शेत माल येथे विकला जाईल (आपणास आधी मिळत नव्हती अशी कॅलिफोर्नियाची सफरचंदे आणि संत्री याच कारणामुळे सध्या मिळतात). त्या मुळे आपले किती परकीय चलन खर्च होते याचा अंदाज आपणाला नसेल.

प्यारीस येथील वातावरण बदला संबंधी परिषदेमध्ये सुद्धा जगातील जास्तीत जास्त प्रदूषण निर्माण करणारे देश म्हणजे चीन, अमेरिका आणि युरोप असताना भारतावर अर्थव्यवस्थेला आवश्यक अशा वीज निर्मितीसाठी कोळसा वापरण्यास निर्बंध आणुन त्याच्या प्रगतीच्या वाटा रोखण्याचा प्रयत्न पुढारलेले देश करत आहेत. पर्यावरण पूरक स्वच्छ आणि स्वस्त उर्जा तयार करण्यास तांत्रिक दृष्ट्या कोणतीही मदत न करता, तसेच पुढारलेल्या देशांच्या प्रदूषणाचे बदल्यात अतिरिक्त झाडे लावण्यासाठी पैसा कबूल करून सुद्धा टाळ टाळ करून भारताच्या प्रगतीच्या नाड्या आवळण्याचा प्रयत्न केला जातो आहे. म्हणजे आम्ही घाण करणारच आणि ती साफ करणार नाही पण तुम्ही केलीत तर तुमच्या पैशांनी तुम्ही साफ

# TRIYUGI ENTERPRISES




**BOX MRP RS. 15/- (25g) & MRP RS. 75/- (200g) BLACK BATTI**













**MUTTA / BUNDLE (100g / 250g)**




**BOX MRP RS. 75/- (90g) WHITE BATTI**



















**PP BAGS / MRP Rs. 75/- (100g)**



TRADE ENQUIRY

## TRIYUGI ENTERPRISES

(Agarbatti products & Pooja Products)

103, Dewan and Sons Industrial Estate No. 7, Navghar, Vasai Road (East), Dist Palghar, Maharashtra; Pin code: 401210 INDIA

Mob / Whatsapp No.: +91-8451886759 | Email ID : triyugi99@gmail.com

करा हा सल्ला हे देश देत आहेत.

हा झाला परकीयांचा आपल्या बरोबरील व्यवहार परंतु आपण कमकुवत आहोत म्हणून इतर देशांची आपल्या कडे वाकड्या नजरेने बघण्याची हिम्मत होते.  सोफ्टवेर सारख्या विषयात सुद्धा आपण मुलभुत संशोधन करत नसून फक्त अमेरिकन कंपन्यांनी तयार केलेल्या प्लाटफोर्म वर काम करत असतो हे विसरून चालणार नाही. टीसीएस आणि इन्फोसिस सारख्या कंपन्यांची हाताच्या बोटावर मोजण्या एव्हडी तयार उत्पादने च फक्त जगप्रसिद्ध आहेत. हार्डवेअर मध्ये तर आपण संपूर्ण परदेशवार अवलंबून आहोत या मध्ये चीन आणि दक्षिण कोरिया ने मोठी उडी घेतली आहे. टेलिकॉम ला लागणारी मशीन जसे कि टोवर्स वगैरे आपण युरोपीय देशांकडून किवा चीन कडून घेतो. हाईटेक शस्त्रास्त्र तर आपण बाहेरूनच विकत घेतो (त्याचे या वेळचे बजेट ८०,००० करोड आहे).

मला मान्य आहे कि जी नैसर्गिक साधन सामुग्री (कच्चे तेल; युरनिअम वगैरे ) आपल्याकडे नाही ती आपण आयात करावी पण जे तंत्रज्ञान विकसित करण्यासाठी लागणारे शिक्षित मनुष्य बळ लागते ते आपल्याकडे आहे परंतु आपले उद्योजग, राजकारणी  आणि सरकारी धोरणे या मुळे अजून आपण जागापेक्षा बरेच मागे आहोत.

या बाबतीत मोदी सरकारची वाटचाल योग्य दिशेने होत आहे हा आशेचा किरण आहे. प्रथम जागतिक व्यापारी परिषदेतील अन्यायकारक दबावाला बळी न पडता अन्न धान्य सुरक्षेबद्दल ठोस भूमिका घेणे. मेक इन इंडिया या धोरणाचा जोरदार अवलंब करणे, परकीयांचे भांडवल परंतु भारतीय मनुष्यबळ यांचे सहायाने औधोगिक  उत्पादनावर भर देऊन हि उत्पादने नुसती स्वतःची गरज न भागवता त्याची करण्याचे उद्धिष्ट ठेवणे. झिरो डिफेकट झिरो इफेकट (शुन्य चुका असलेली आणि वातावरणावर शुन्य विपरीत परिणाम करणारी उत्पादने बनवणे). त्याने आपले मौल्यवान परकीय चलन वाचून त्याच्या गंगाजळीत भर पडेल आणि भारतीय अर्थ व्यवस्थेचा वेग वाढेल आणि मागणारयाला काम मिळेल. परकीय आर्थिक साम्राज्यवाद टाळण्यासाठी हा एक उत्तम उपाय आहे.

नुकतेच नेट नुटरयालीटी मध्ये भारतीय टेलिकॉम प्राधिकरणानि घेतलेली भूमिका या बाबतीत फार महत्वाची ठरते. फेसबुक सारख्या कंपन्या फ्री इंटरनेट च्या नावाखाली माहितीचा स्त्रोत भारतीयांना आपल्या पद्धतीनी सीमित करायला बघत होत्या. त्या मध्ये काही ठराविक वेबसाईट वरील माहिती फुकट आणि काही वेबसाईट वरील माहिती वेगवेगऴया दराला भारतीय टेलीकॉम कंपन्यान मार्फत ग्राहकांना पुरवण्याचा घाट या साम्राज्यवादी कंपन्यांनी घातला होता. त्या मुळे गरीब माणसाला इंटरनेट च्या प्याकेज

शिवाय जास्त पैसे विशिष्ट वेबसाईट वरील माहिती साठी मोजावे लागणार होते. अशाप्रकार चा, भेदभाव करण्याला या प्राधिकरणाने सध्या तरी मज्जाव केला असून सर्व माहिती सर्वांना सारख्याच किमतीला मिळेल आणि माहितीचे स्त्रोत श्रीमंतांपुरते मर्यादित राहणार नाही याची खबरदारी घेतलि. असे झाले नसते तर या कंपन्यांनी माहितीमुळे तयार होण्यारया आपल्या विचारांवर ताबा घेण्याचा प्रयत्न केला असता, आणि काही प्रमाणात का होईना आपली विचार प्रक्रिया नियंत्रित असती.

या वर उपाय काय ? मला वाटते आपल्या नवजवानांनी जग भर जावे, तंत्रज्ञान आणि जागतिक व्यापाराचा अभ्यास करावा, जगातील चांगल्या गोष्टी शिकून त्याचा उपयोग भारताला कसा होईल याचा विचार करावा आणि तो अमलात आणण्याचा प्रयत्न करावा. या बाबतीत आणखी एक गोष्ट मला सांगाविशी वाटते. माझ्या एका जेष्ट मित्राशी बोलताना असे लक्षात आले कि त्याला भारताबद्दल इतका अभिमान आहे कि त्याच्या मते परदेशी शिकण्याचे कोणालाही कारण नाही. मी त्यांना म्हटले कि आपण एक उक्ती ऐकली असाल "केल्याने देशाटन, विद्वानांच्या सहवासात राहिल्याने, सभेत वार्तालाप केल्याने विद्वत्तेत आणि चातुर्यात भर पडते असे म्हणतात”.  देशाबद्दल जरूर अभिमान असावा परंतु कोणाचे काही चांगले असल्यास ते घ्यायला काय हरकत आहे? म्हणताना म्हणायचे हे विश्वाची माझे घर आणि पुण्याच्या पुढे जायला टाळाटाळ करायची.

ब्रिटीशानी असा विचार केला असता तर त्यांचे साम्राज्य कधीच वाढले नसते. आमच्या देशातील चहाच्या मळ्याचे ब्रिटीश मालक चहाची रोपे चीन मधून घेऊन आले होते आणि तंत्रज्ञान त्यांनी विकसित केले होते. आणि आमचा  कोकणचा मजूर चहा प्याल्याशिवाय कामाला हात लावत नाही अशी सवय त्यांना लागली आहे. अर्थात पुढारलेल्या देशांना सुद्धा हि संपत्ती आणि तंत्रज्ञान आपोआप मिळाली नाही. ब्रिटिश,  फ्रेंच, पोर्तुगीझ अंमलदार आणि शिपायांनी सुरवातीला येथे फार हाल अपेष्टा काढल्या असतील. येथील वातावरण, खान पान, येथील संस्कृती याचे ज्ञान आणि ते अंगवळणी पडायला त्यांना सुद्धा वेळ लागला असणार पण त्यांची चिकाटी आणि जिद्द या जोरावर त्यांनी अनेक असाध्य गोष्टी साध्य केल्या.

माधव भोळे (मोब ८४५ १८८ ६७५९)

Madhavbhole99@gmail.com

# शब्द

शब्द कळतात मला, आणि म्हणूनच
छळतात मला
म्हणजे, त्रास नाही हा देत, मनात
घोटाळत राहतात
कधी एकदाचे, मनाच्या कोऱ्या पाटीवरून, अलगद
उतरून
एक अर्थपूर्ण गोफ गुंफतात , असे होवून जाते

कधी ,कधी अगदीच निरर्थक पणे
बाहेर पडायला धडपडत असतात
सांगितले तरी ऐकतच नाहीत
मग काय, वायफळ गप्पा होतात
त्यांचाशी माझ्या, अगदी शिळोप्याच्या

कधी कधी, हवे असतात न
चपखल बसणारे शब्द, तेव्हा मात्र
दडी मारून बसतात, जणू
लपाछपिचा खेळ खेळतात

कधी कधी न असे वाटते कि रुसून बसलेत
काही काही शब्द,
काय करणार बिचारे, आपण सतत
दुसऱ्या भाषेच्या प्रेमात, आणि
ते जणू पोटमाळ्यावर अडगळीत किंवा
वृद्धाश्रमात, जर्जर आणि जुने झालेत म्हणून

काही काही शब्द मात्र खुश आहेत अगदी
कारण अजून तरी, आपण तेच वापरतो न बोलताना
उसन्या भाषेतले प्रतिशब्द नाहीयेत अजून त्यांना
म्हणून टिकले आहेत बापडे अजूनही

पण खर सांगू, अजूनही पावसाला आपण विशेषण
देताना
जो पर्यंत रिमझिम, मुसळधार म्हणतो
विजेचा कडकडाट आणि ढगांचा गडगडाट आहे
जो पर्यंत, आभाळ आणि आकाश, मेघ आणि ढग
काळोख आणि अंधार, प्रज्ञा आणि बुद्धी
यातलि फरकाची सूक्ष्म किनार आपल्याला
कळत आहे न , तो पर्यंत तरी
मला या शब्दांची काळजी नाही

किती छळले न त्यांनी मला
तरी मला हवच आहे ते
ते जगले तर माझी भाषा जगेल
माझी भाषा जगेल तरच
माझा श्वास टिकेल,
कारण तरच माझे मन
माझ्याशी बोलेल
माझे शब्द जगातील तरच मी जगेन

आई शिवाय माझे अस्तित्व नाही
मग मातृभाषे, शिवाय तरी ते कसे उरेल?
शब्द कळतात मला, आणि म्हणूनच छळतात मला
मी त्यांना जवळ केलय आणि त्यांनी मला केलय
त्यांची उपेक्षा कधी खरच थांबेल का ?
मायेची पाखर कुणीतरी आपल्यावर धरावी
म्हणून त्यांची असणारी हि प्रतीक्षा कधी तरी संपेल
का ?

शीतल जोशी



# कृष्ण सखा

अर्जुन झालाय माझा
म्हणून कृष्ण शोधतोय मी एक
एक सखा जो परखड असेल
जो खंबीर पणे उभा राहील
माझ्या संकटात माझ्या समवेत

माझा आनंद त्याच्या हास्यात उमटेल
आणि माझे दु:ख त्याच्या बासरीच्या सुरात उमटेल

त्याच्यात आणि माझ्यात अंतर असेल कैक मैलांचे
पण तरीही तो गाठेल हे अंतर प्रकाश वेगाने

मला नको आहे देवत्वाचा अंश असणारा कृष्ण
न मला त्याची पूजा करायची आहे, संकटे येवूच नयेत म्हणून

मला तो केवळ एक सुहृद म्हणून हवाय , ज्याचा मीही एक
मित्र होवू शकेन

मला जो केवळ योग्य मार्ग दाखवेल आणि कधी गरज
पडलीच तर माझी मैत्री हि पाराखेल

सापडेल का असा तो कृष्ण सखा
कि आहेच इथे कुठेतरी , दिसून न
दिसल्या सारखा

कदाचित माझ्यातच कुठे तरी
केवळ मी मनापासून साद घालायची
वाट पाहतोय
माझा कृष्ण सखा , माझ्याच मनातला

- शीतल



# एक झलक

तू दिसली नाहीस आज
झाले मन खिन्न खिन्न
पाहून हसली नाहीस आज
झाले काळीज छिन्न विछिन्न

नेहमीचेच सारे काही
तरी वाटे मज अनोळखी
का घुटमळे जीव इथे उगी उगी
बोलताना मित्रांसवे का वळूनी पुन्हा बघी

येशील आत्ता नि भेटशील
देशील हात माझ्या हाती
नेशील दुनियेत चंदेरी
घेशील मखमली बाहुपाशी

सांगतोय नाव तुझेच
फलक हृदयातला
देई मज आनंद
एक झलक जगण्यातला .

सागर



# भ्रष्टाचाराची ऐशीतैशी

(मराठी रहस्यकथा)

ही आगळीवेगळी कथा आहे आफ्रिकेतल्या नायजेरिया देशातली. जेंव्हा श्रीयुत अगराबी तिथले अर्थमंत्री झाले तेंव्हाची. तसे ह्या नवीन अर्थमंत्री नियुक्तीचे फारसे कौतुक कुणाला नव्हते. राजकीय समीक्षकांच्या मते तर ही "रोज मरे त्याला कोण रडे" यातली गोष्ट होती. आणि तेही काही पूर्णपणे खोटे नव्हते — वेगवेगळ्या घोटाळ्यांमुळे गेल्या १७ वर्षात नायजेरियाचे अर्थमंत्री तब्बल १७ वेळा बदलले गेले होते!
"जर तुम्ही भ्रष्टाचारापासून चार हात दूर असाल तरच माझ्या तावडीतून वाचाल" अशी गर्जना अगराबींनी शपथविधीच्या कार्यक्रमातच केली. भाषणाचा शेवट त्यांनी नायजेरियाला भ्रष्टाचारमुक्त करण्याचे गंभीर आश्वासन देऊन केला. पण ह्या आश्वासनांना कुणी फारसा भाव दिला नाही. वृत्तपत्र संपादकांच्यामते तर आधीच्या १७ अर्थमंत्रांनी अशीच आश्वासने दिली असल्याने त्यात छापण्यासारखेसुद्धा विशेष काही नव्हते.

अगराबींनी मात्र बोलल्याप्रमाणे करण्याचा सपाटाच लावला. काही दिवसातच खाद्यमंत्रालयातील एका अधिकाऱ्याला खोटी कागदपत्रे बनवल्याबद्दल त्यांनी तुरुंगात पाठवले. पुढचा फटका आयात-निर्यात खात्यातील एका उच्च अधिकाऱ्याला बसला आणि हद्दपार होण्याची कठोर शिक्षा त्याच्या वाट्याला आली. त्यानंतर महिनाभरातच अगराबींनी सर्वांनाच एक जबरदस्त धक्का देऊन त्यांची दखल घेण्यास भाग पाडले — पोलीस खात्यातील सर्वोच्च अधिकाऱ्यालाच त्यांनी लाच घेताना रंगेहात पकडवून दिले! त्या अधिकाऱ्याला नंतर न्यायालयाने पुराव्यांच्या आधारे १८ महिन्याच्या सक्त कारावासाची शिक्षा ठोठावली.

आता मात्र नायजेरियाचे नागरिक ह्या नव्या अर्थमंत्र्याकडे आशेने पाहू लागले. काहींनी तर त्यांना "भ्रष्टाचार संपवणारा अवतार" अशी उपाधी दिली.
भ्रष्टाचारी मंत्री आणि अधिकारी आता अस्वस्थ होऊ लागले. अगराबीनी मात्र आपले काम अथक चालूच ठेवले. अटकेवर अटकेचे



सत्र चालू राहिलं. पुढे पुढे तर अगराबींच्या करडया नजरेखाली नायजेरियाचे सर्वेसर्वा "जनरल ओतोबी" सुद्धा असल्याच्या अफवा पसरु लागल्या. श्रीयुत अगराबींनी आता सर्व परराष्ट्र कंपन्यांबरोबरचे आर्थिक करार जातीने पाहायला सुरुवात केली. करोडो रुपयांचे व्यवहार त्यांच्या स्वाक्षरीविना अडू लागले. अर्थातच त्यांच्या विरोधकांनी या सर्वच व्यवहारांची कसून तपासणी केली पण त्यात ते आक्षेपार्ह असे काहीच शोधू शकले नाहीत. जनमानसात अगराबींची प्रतिमा "एक स्वच्छ नेता" अशी रुजू लागली. या लोकमताच्या बळावर अगराबी सलग दुसऱ्यांदा अर्थमंत्री म्हणून निवडून आले आणि मग मात्र राजकीय समीक्षकसुद्धा त्यांच्याकडे कौतुकाने बघू लागले.

त्यानंतर काही दिवसातच प्रत्यक्ष "जनरल ओतोबी" यांनी अगराबींना अचानक भेटीसाठी आपल्या घरी बोलावले. श्रीयुत अगराबी बरोबर ठरलेल्या वेळी त्यांच्या घरी पोहोचले. जनरल ओतोबींनी त्यांचे साजेसे स्वागत करून आपल्या फक्त खासगी चर्चेसाठी असणाऱ्या वैयक्तिक कक्षात नेले.



"श्रीयुत अगराबी, " जनरल ओतोबींनी आपल्या भारदस्त आवाजात बोलायला सुरुवात केली. "मी आत्ताच तुम्ही सादर केलेला आर्थिक अहवाल वाचून पूर्ण केला. तुमच्या म्हणण्याप्रमाणे परराष्ट्रीय कंपनींच्या योजनांमध्ये अजूनही करोडो रुपयांचा भ्रष्टाचार होत आहे. खरंतर हे वाचून मला धक्का वगैरे बसला नाही. पण मी हे जाणायला उत्सुक आहे की हे पैसे नेमके कुणाच्या खिशात जात आहेत."

श्रीयुत अगराबी ताठ मानेने जनरल ओतोबींकडे पहात होते. त्यांच्यावरची आपली तीक्ष्ण नजर न काढता ते म्हणाले, "मला शंका आहे की हे पैसे स्विस बँकेमध्ये काही खात्यामध्ये गुप्तरित्या जमा होत आहेत. ती खाती नेमकी कोणाची आहेत याची मात्र मला अजून खात्रीलायक माहिती मिळवता आली नाहीये. कदाचित माझे मर्यादीत अधिकार माझा अडथळा बनत आहेत."

"तर मग मी तुम्हाला लागतील ते अधिकार द्यायला तयार आहे. पण ही माहिती मिळवणे आवश्यक आहे. तुम्ही काम सुरु ठेवा, कोणाचाही मुलाहिजा बाळगू नका अगदी माझ्या मंत्री मंडळातील मंत्री सुद्धा याला अपवाद नाहीत. कोणतीही दया-माया दाखवू नका. कोणाचाही हुद्दा, अधिकार, राजकीय नाते-संबंध याचे दडपण न ठेवता तुमचे तपासकार्य चालू राहूदे."

या जनरल ओतोबींच्या आश्वासनाने अगराबी प्रसन्नपणे हसले व म्हणाले, "अशा प्रकारचे

काम पार पाडण्यासाठी मला तुमच्या स्वाक्षरीचे सर्वाधिकार पत्र लागेल. तसेच ..."

अगराबींना त्यांचे वाक्य पूर्ण न करु देता जनरल ओतोबी म्हणाले, "ते अधिकारपत्र आज संध्याकाळी ६ वाजेपर्यंत तुमच्या टेबलावर असेल."

"हे सर्वाधिकार मला परदेश दौऱ्यात सुद्धा लागतील जेणेकरुन मला स्वीस बँकेतल्या खात्यांची माहिती मिळवणे सोपे जाईल.", अगराबींनी आपले अर्धे राहिलेले वाक्य पूर्ण केले.

"मंजुर आहे." जनरल  ओतोबी हसतमुखाने म्हणाले. आणि चर्चा संपली असे समजून दोघेही उठले.

"आभारी आहे" असे म्हणत अगराबी दरवाज्याच्या दिशेने निघाले तेवढयात जनरल ओतोबींनी खिशातून एक छोटे पिस्तुल बाहेर काढले.

अगराबींनी चमकून जनरल ओतोबींकडे आणि त्यांनी बाहेर काढलेल्या पिस्तुलाकडे पहिले.

"हे जवळ ठेवा. मला खात्री आहे तुम्हाला बरेच शत्रू तयार झाले असतील. आणि नसतील तर आता होतील." पिस्तुल पुढे करत जनरल ओतोबी म्हणाले.

"धन्यवाद" असे पुटपुटत अगराबींनी ते पिस्तुल आपल्या खिशात ठेवले आणि ते बाहेर पडले.

त्यानंतर अगराबींनी आपले काम अजून वेगाने सुरु केले. रात्र-रात्र ते कागदपत्रे वाचत असायचे, संगणकावरचे रेकॉर्डस तपासायचे. पण दिवसा याबद्दल कोणाशीही एक चकार शब्द बोलायचे नाहीत. जवळपास तीन महिन्यानंतर अगराबी आपले कार्य तडीस न्यायला सिद्ध झाले. आपल्या गुप्त परदेश दौऱ्यासाठी त्यांनी ऑगस्ट महिना निवडला. हा नायजेरियन नागरीकांसाठी सुट्टीचा महिना असल्याने बहुतांशी लोक प्रवासाला जायचे आणि त्यामुळे अगराबींची अनुपस्थिती फारशी कुणाला जाणवणार नाही हा त्यामागचा मूळ उद्देश. त्यांनी आपल्या सेक्रेटरीला आपल्यासाठी व आपल्या कुठुंबियांसाठी अमेरिकेचे विमान-तिकिट काढायला सांगितले. त्याचा खर्च आपल्या वैयक्तीक खात्यातून करायचे सांगायला मात्र ते विसरले नाहीत!

अमेरिकेतील ओर्लांडो या
ठिकाणी पोचल्यादिवशीच
अगराबींनी बायकोला आपण काही दिवस न्यूयॉर्कला कामानिमित्त जाणार असल्याचे सांगितले. दुसऱ्या दिवशी सांगितल्याप्रमाणे बायका-मुलांना ओर्लान्डो डीजने-पार्क मध्ये सोडून अगराबी न्युयोर्कला विमानाने निघाले. न्युयोर्क विमानतळावरच त्यांनी स्विझर्लंडचे

# नवी अर्थक्रांती मासिक







## चला घडवूया साक्षर, संपन्न आणि समृद्ध महाराष्ट्र

### उद्दिष्टे

- सर्व स्तरावर आर्थिक ज्ञान पोहोचवणे
- महाराष्ट्रातील तरुणाईला एकत्र आणणे.
- समृध्द खेड्यांची निर्मिती करणे. शहर खेडी जोडणे
- सर्व गावांत नवी अर्थक्रांती मासिक पोहोचवणे.
- महाराष्ट्रात एक लाख उद्योग उभे करणे.
- शेतमालाला हमीभाव तसेच उत्पन्नात वाढ करणे.
- आर्थिक साक्षरतेचा प्रसार व प्रचार करणे.
- पाणी नियोजन व वृक्षलागवड करणे.

## दिवाळीच्या हार्दिक शुभेच्छा !






उपलब्ध : *संपूर्ण महाराष्ट्र (भारतभर मागणीनुसार)*

वाचकसंख्या : 3 लाख

**आपली प्रत आजचं राखून ठेवा**

: 7208145022 / 9767002958

/ NaviArthkranti



: naviarthkranti@gmail.com

: naviarthkranti.com

रिटर्न तिकीट रोख पैसे भरून खरेदी केले आणि काही तासातच अगराबींचा स्वित्झर्लंडकडे प्रवास सुरु झाला. स्वित्झर्लंडमध्ये पोचल्यावर त्यांनी एका छोट्याशा हॉटेलमध्ये रूम बुक केली व जेवण करून तब्बल आठ तासाची निवांत झोप घेतली. सकाळी उठल्यावर नाश्ता करता-करता त्यांनी नायजेरियात गेल्या तीन महिन्यात काळजीपूर्वक बनवलेली बँकेंची लिस्ट डोळ्याखालून घातली व त्यातल्या पहिल्या बँकेच्या चेअरमनला फोन लावला. दुपारी बारा वाजताची भेटीची वेळ दोघांना सोयीची असल्याने त्या वेळी भेटायचे ठरवून त्यांनी फोन बंद केला.

एक साधी सुटकेस सोबत घेऊन अगराबी वेळेच्या काही मिनिटे आधी बँकेत पोचले. एक अधिकारी त्यांचे स्वागत करण्यासाठी बाहेरच उभा होता. नायजेरियाच्या अर्थमंत्र्याच्या साध्या वेषाचे आश्चर्य चेहऱ्यावर न दाखवता तो अधिकारी त्यांना तडक चेअरमनच्या ऑफिसकडे घेऊन गेला.

दारावर टकटक करताच आतून "आत या" असा आवाज आला आणि दोघेही ऑफिसमध्ये गेले. अगराबींना पाहताच चेअरमन खुर्चीवरुन उठले आणि हस्तांदोलनासाठी पुढे आले. प्राथमिक ओळखीनंतर तिघे ऑफिसमध्ये चर्चेसाठी असणाऱ्या कक्षात गेले.

चहापानाचा सोपस्कार उरकल्यानंतर अगराबींनी वेळ न दवडता थेट मुद्याला हात घातला, "माझ्या राष्ट्राध्यक्षांच्या खास आज्ञेवरून मी इथे आलो आहे. आपल्या बँकेत ज्या नायजेरियन नागरिकांची खाती आहेत त्यांची माहिती मला हवी आहे."

बँक चेअरमन हे ऐकल्यावर गडबडीने म्हणाले, "मला तशी माहिती देण्याचे अधिकार नसून ..."

त्यांचे बोलणे अर्ध्यावर तोडून एका हाताने त्यांना थांबवत अगराबी म्हणाले, "मला एकदा माझे म्हणणे पूर्णपणे मांडू द्यावे अशी माझी विनंती आहे. मला राष्ट्राध्यक्षांनी या बाबतचे सर्वाधिकार दिले आहेत." आणि त्यांनी आपल्याजवळचे अधिकारपत्र सादर केले.

चेअरमननी ते अधिकारपत्र पूर्णपणे वाचले आणि मग घसा साफ करत ते बोलले, "मला मान्य आहे की आपण इथे आपल्या राष्ट्राध्यक्षांच्या विनंतीवरुन पूर्ण अधिकारासहित आला आहात पण मला कृपया क्षमा करावे. आमच्या बँकेच्या नियमानुसार मी कोणत्याही खातेदारांची माहिती देऊ शकत नाही. आणि या नियमाला कोणताच अपवाद नाही. आपण आमच्या बँकेला भेट दिल्याबद्दल मी आभारी आहे पण मी आपली या कामामध्ये काहीच मदत करू शकत नसल्याने दिलगीर आहे." एवढे बोलून चर्चा संपली या उद्देशाने चेअरमन आणि त्यांच्याबरोबरचा अधिकारी दोघेही उठले.

पण अगराबी आपल्या खुर्चीवरुन न उठता

म्हणाले, "मी आपल्याला सांगू इच्छितो की आपण सहकार्य केलेत तर माझ्या देशाच्या संपूर्ण परराष्ट्र व्यवहारांसाठी आम्ही आपल्या बँकेची मध्यस्त म्हणून निवड करू इच्छितो."

"आम्ही अशा प्रकारच्या व्यवहारांसाठी नेहमीच आपले ऋणी राहू. पण तरीही यामुळे आमच्या नियमामध्ये फरक पडू शकणार नाही व आम्ही कोणत्याही खातेदारांची माहिती देऊ शकणार नाही हे आपण कृपया लक्षात घ्यावे." या चेअरमनच्या वाक्याने विचलित न होता अगराबी ठामपणे म्हणाले, "तर मग मला आमच्या परराष्ट्र खात्याला आपल्या असहकार्याबद्दलची तक्रार करावी लागेल. तसेच ह्या बद्दल तुमच्या देशाच्या अर्थखात्याकडे आणि प्रसारमाध्यमांकडे तशी तक्रार दाखल करावी लागेल. ह्या सर्व संभाव्य अडचणी टाळायच्या असतील तर आपण कृपया माझी विनंती मान्य करून खातेदारांची माहिती द्यावी. मी आपल्याला खात्री देतो की आपण अशी माहिती दिल्याची कुठेही वाच्यता होणार नाही."

"आपण खुशाल अशी तक्रार दाखल करू शकता. पण मी बँकेच्या नियमांनी बांधील आहे. तसेच स्वित्झर्लंडच्या कायद्यानुसार आमच्या अर्थखात्यालासुद्धा बँकेच्या नियमामध्ये फेरफार करता येऊ शकत नाही." चेअरमन तेवढयाच ठामपणे उतरले.

"जर असे असेल तर आजपासून नायजेरियाचे आपल्या देशाशी होणारे सर्व व्यवहार मला थांबवावे लागतील. तसेच स्वीस नागरिकांना आणि कंपन्यांना दिल्या जाणाऱ्या नायजेरियातील सर्व सुविधा काढून घ्याव्या लागतील. मी तुम्हाला खात्री देतो की यातले काहीही करताना मी जरासुद्धा कचरणार नाही."

"आपण आपल्या अधिकारातील कोणतीही गोष्ट करू शकता. पण मी आपली याबाबत कोणतीच मदत करू शकणार नाही. तेंव्हा आपण ही चर्चा इथेच थांबवलेली योग्य. पुन्हा एकदा आपण आमच्या बँकेमध्ये ... " चेअरमनना त्यांचे वाक्य पूर्ण करू न देता अगराबींनी खिशातून पिस्तुल बाहेर काढले व त्यांच्यावर रोखून ते बोलले, "आपण मला  दुसरा कोणताच मार्ग शिल्लक ठेवला



STV

स्वप्नील भावे

सुबोध जोशी

इंदर राज कपूर प्रस्तुत

# फुगे

प्रेमाची BACKSTORY

दिग्दर्शिका स्वप्ना वाघमारे जोशी
निर्माता अश्विन अंचन
सहनिर्माते अनुराधा जोशी
अर्जुन सिंग बरन आणि कार्तिक निशाणदार

डिसेंबर २०१६

निर्माता एस टिव्ही नेटव्हर्क कं. सहनिर्माता जिसिम्स माय प्रोडक्शन
कथा स्वप्नील-सुबोध पटकथा हेमंत ढोमे आणि अभिजीत गुरू छायाचित्रण प्रसाद भेंडे
संगीत रोचक कोहली, अमितराज सावंत आणि निलेश मोहरीर निर्मिती व्यवस्थापक दिनेश सातपुते संकलन क्षितिजा खंडागळे

MAAY PRODUCTIONS

GSEAMS

mantra sds

नाहीये त्यामुळे नाईलाजाने मला याचा उपयोग आपल्यावर करावा लागेल. मी आपल्याला शेवटचे विचारतो आहे — आपण मला माझ्या देशातल्या खातेदारांची माहिती देणार आहात  की नाही?"

आता मात्र चेअरमनच्या चेहऱ्यावर भीती दिसू लागली. सोबतच्या अधिकाऱ्याच्यासुद्धा कपाळावर हे पाहून घामाचे थेंब जमा झाले. पण त्यातूनही चेअरमनने मानेने नकार दिला. अगराबींनी पिस्तुलाच्या मागचा खटका सरकवला जेणेकरून आता कोणत्याही क्षणी ते पिस्तुलातून गोळी झाडू शकतील. "मी आता अगदी शेवटचे विचारतो आहे. होणाऱ्या परिणामाला पूर्णपणे तुम्ही जबाबदार आहात हे ध्यानात ठेवा. आपण माहिती देणार आहात की नाही?"

चेअरमन आणि सोबतचा अधिकारी — दोघांनीही आता कोणत्याही क्षणी पिस्तुलातून गोळी निघेल आणि आपला बळी जाईल या भीतीने डोळे गच्च मिटून घेतले. काही क्षण गेल्यानंतर अजून कसा आवाज आला नाही म्हणून दोघांनी डोळे उघडून पहिले तर अगराबींच्या चेहऱ्यावर हास्य होते आणि ते तसेच कायम ठेवत ते म्हणाले, "कमाल! मी खरंच आपल्या आणि आपल्या बँकेच्या गुप्ततेवर खुश आहे. कृपया मला आपण आपल्या बँकेत खाते कसे उघडायचे याची माहिती द्याल का?" एवढे बोलून त्यांनी आपल्या बरोबर आणलेली साधी दिसणारी सुटकेस उघडली आणि त्यात काठोकाठ भरलेल्या नोटा पाहून बँकेचे चेअरमन आणि सोबतचा अधिकारी दोघेही क्षणापुर्वीची भीती विसरुन अगराबींच्या हास्यात सामील झाले!

(पूर्व प्रकाशन संकेतस्थळ: कट्टा ऑनलाईन)



# ब्लॉगस्पॉट की वर्डप्रेस



अनेक मराठी लेखकांना , उत्कृष्ट लेखन करता येते, पण ब्लॉग बनवायला लागणारे तांत्रिक कौशल्या मध्ये ते मागे पडतात. जसे उत्कृष्ट लेखन महत्वाचे असते तेवढेच ते लेखन वाचकांपर्यन्त पोहचणे तेवढेच महत्वाचे असते.

ब्लॉग बनवताना सर्वात पहिला प्रश्न येतो ... ब्लॉग कोणत्या CMS मध्ये बनवायचा. (CMS – CONTENT_MANAGEMENT SYSTEM) . ब्लॉगस्पॉट की वर्डप्रेस.

याहून मोठा प्रश्न ब्लॉग सेल्फ होस्टेड करायचा की नाही?

आता सेल्फ होस्टेड म्हणजे काय ... जर तुम्हाला तुमच्या ब्लॉगला ABC.COM असे स्वतचे नाव हवे असेल तर तो सेल्फ होस्टेड.

किंवा तुम्ही ABC.blogspot.com किंवा ABC.wordpress.com असे फ्री नाव पण वापरू शकता.

आता प्रश्न उरतो सेल्फहोस्टेडसाठी काय करायचे आणि कसे?

सेल्फ होस्टिंग साठी 2 महत्वाच्या गोष्टी .. १. डोमेन नेम (संकेतस्थळाचे नाव) – ABC.com – खर्च जास्तीत जास्त ६५० रु. (वार्षिक)

२. होस्टिंग (संकेतस्थळाची ऑनलाइन जागा ) – खर्च जास्तीत जास्त २५००रु. (वार्षिक)

आता जर तुम्हाला तुमचा ब्लॉग मोफत सुरू करायचा असेल तर २ पर्याय आहेत..

१. ब्लॉगस्पॉट.कॉम

२. वर्डप्रेस.कॉम

वर्डप्रेस की ब्लॉगस्पॉट

घेणार्याच्या अपेक्षेपेक्षा देणार्याची ऐपत नेहमीच कमी असते

~ व पु काळे

## १. स्वतच्या ब्लॉगवर कंट्रोल.

ब्लॉगस्पॉट हे गुगलचे प्रॉडक्ट आहे, जेवढे ते स्टेबल आहे तेवढेच धोकादायक , कारण ब्लॉग जरी तुमचं स्वतचा असला तरी तुमची त्यावर मालकी नसेल, तुमचा ब्लॉग गुगल कोणतेही कारण न देता कधीही BAN करू शकतो. जर काही SPAMMERS नि तुमच्या ब्लॉगला स्पॅम म्हणून रीपोर्ट केले तर तुमचा ब्लॉग गुगल बंद करू शकतो आणि असे घडलेले आहे आपण यासाठी गुगलवर सर्च करू शकता.

वर्डप्रेस च्या बाबतीत हा धोका कमी आहे. जर आपण वर्डप्रेसचा सेल्फहोस्टेड CMS वापरली तर हा धोका अजिबातच नाही. (WORDPRESS.ORG)

## २. सर्च इंजिन ऑप्टीमायझेशन (SEARCH ENGINE OPTIMIZATION)

तुम्ही ब्लॉग कितीही चांगला लिहा , महत्वाचे असते ते वाचकांनी तो वाचणे . यासाठी आपला ब्लॉग सर्च इंजिन फ्रेंडली असणे महत्वाचे आहे. म्हणजेच वाचकांना आपला ब्लॉग गूगल बिंग अश्या सर्च मधे सापडायला हवा .

या बाबतीत वर्डप्रेस ब्लॉगस्पॉट पेक्षा वरचढ ठरते.

## ३. प्लगीन्स / मोडूल्स

वर्डप्रेस मधे ब्लॉगस्पॉट पेक्षा अधिक प्लगीन्स आहेत. वर्डप्रेस वरील अनेक प्लगीन्स मोफत उपलब्ध आहेत. तर वर्डप्रेस ही मोठी COMMUNITY असल्याने आपल्या अडचणीची उत्तरे इथे लगेच मिळतात.

## ४. थीम / टेम्पलेट

वर्डप्रेस हे सॉफ्टवेअर ब्लॉग तसेच संकेतस्थळ बनवण्यासाठी वापरण्यात येते, त्यामुळे येथे अनेक मोफत थीम उपलब्ध आहेत , वर्डप्रेस वर आपण स्वताचे ऑनलाइन शॉप सुद्धा अगदी सहज बनवू शकतो. इथेही वर्डप्रेस ब्लॉगस्पॉट पेक्षा वरचढ ठरते.

## ५. अॅडसेन्स

ब्लॉग मधून उत्पन्न मिळवण्याचा सर्वात प्रसिद्ध मार्ग म्हणजे GOOGLE ADSENSE. हे गुगलचे चे प्रॉडक्ट असल्याने सुरूवातीला ब्लॉगस्पॉट वापरणाऱ्या ब्लॉगर्स चे ब्लॉग लवकर अडसेन्स साठी पात्र ठरायचे. मात्र आता हे फार कठीण झाले आहे. त्या पेक्षा सेल्फ होस्टेड ब्लॉग लवकर पात्र ठरतात.

गुगल साठी ब्लॉगस्पॉट हे एक फक्त प्रॉडक्ट आहे, गुगलचा अत्ता पर्यंतचा इतिहास

बघितला तर गूगल रीड किंवा ऑर्कूट अशी तोटया मधील सॉफ्टवेर्स गुगलनी बंद केली आहेत. त्यामुळे ब्लॉगस्पॉट सुद्धा बंद करण्याचा निर्णय गुगल घेऊ शकते. अश्यावेळी आपला ब्लॉग हलवणे आणि ते सुद्धा तुमच्या ब्लॉगच्या नियमित वाचकांसह खूप कठीण जाईल..

म्हणूनच माझ्यामते , जर आपण मनापासून ब्लॉग लिहाणार असाल तर थोडा खर्च करायला काहीच हरकत नाही.. तुम्ही तुमचा स्वताचा ब्लॉग सुरू करू शकता जास्तीत जास्त (३००० रु.) वार्षिक.

स्वप्नील

## उद्योजकीय संस्कार

मराठी माणसाच्या मनाचे उद्योजीकरण अद्यापही म्हणावे तसे झाले नाही. याचे कारण अवतीभोवतीचे संस्कार, बुरसटलेले सामाजिक विचार, कौटुंबिक विचार, आळशी वृत्ती यामध्ये श्रमाला प्रतिष्टा मिळू शकत नाही. हि दुर्दैवाची बाब आहे. उद्योजकीकरणाचे सामाजिक बीजारोपण करणे गरजेचे आहे. हे परिवर्तन श्रम, प्रतिष्ठा, सकारात्मक विचारसरणी या संस्कारातूनच होण अपेक्षित आहे. कारण हि काळाची व बदलत्या जीवन शैलीची खरी गरज आहे.



# Google AdSense

काय आहे हे Google Adsense ....?

आपल्या पैकी..बर्याच जणांना. ... अजून हे माहित नाही....

आता Google सगळ्यांनाच माहित आहे...इन्टरनेट वर काहीही शोधायचे असेल तर सर्व प्रथम ज्याची आठवण येते ते गुगल..

तुम्ही गुगल चा वापर रोज..करता...तो ही अगदी मोफत..

कधी विचार केला...गुगल हे सगळे मोफत कसे उपलब्ध करून देते...



ही कंपनी चालते तरी कशी...

या वर नीट विचार केला तर लक्ष्यात येईल... ही कंपनी अगदी तशीच चालते ...जसे आपल्या टीव्ही वरील Free To Air Channels ..

म्हणजेच Advertising वर..

तसेच ही गुगल कंपनी पण चालते Advertising वर..

आता याचा आणि आपल्या Google Ad-sense चा काय संबंध..

संबंध आहे...

गुगल वर आपण जेव्हा काहीही शोधतो..तेव्हा समोर येणाऱ्या पर्यांपैकी सर्वात वर येणारे २-३ पर्याय..हे खरे तर Advertise असतात ...तुम्ही जेव्हा त्यावर क्लिक करता..तेव्हा गुगल कंपनीला त्याचा फायदा होतो..

असो..

आपण पुन्हा एकदा आपल्या मुख्य गोष्टी कडे येऊ..Google Ad-sense ..

गुगल ने Adsense ही सेवा ब्लोगलेखक, वेबसाईट डेव्हलपर साठी बनवली..

या  सेवेतून गुगल ने ब्लोग लेखकांना त्यांच्या लिखाणातून उत्तपन्न कसे मिळवता येईल ते दाखवले..

थोडे गुंतागुंतीचे आहे ..पण सोपे आहे..

तुम्ही फक्त गुगल ची किंवा गुगलच्या माध्यमातून येणाऱ्या Advertise ला तुमच्या

ब्लोगवर किंवा वेबसाईट वर जागा द्यायची..

जेव्हा कोणीही वाचक ..तुमच्या ब्लोगवर असलेल्या Advertise वर क्लिक करेल तेव्हा नक्कीच गुगलला त्यातून नफा होणार ... मग गुगल त्या नफ्याचा काही भाग हा ब्लोग लेखकाला देणार..

असा साधा आणि सोपा फंडा आहे..

आता Google adsense च्या माध्यमातून अधिक उत्पन्न कसे मिळवायचे ते पाहू..

गूगल च्या माध्यमातून उत्पन्न मिळवणे हे काही फार कठीण काम नाही, यासाठी महत्वाचे काही लागत असेल तर ते म्हणजे "संयम". ब्लॉग लिहिण्यास सुरुवात केल्या केल्या उत्पन्न सुरू व्हावे असि आपली अपेक्षा असेल तर Google Adsense त्यासाठी नाही. गुगल च्या माध्यमातून कामावण्यासाठी खाली काही टिप्स देत आहे..

१. Keyword Density :- Keyword म्हणजे असा शब्द, जो आपल्या पोस्ट ला एका शब्दात सूचित करतो. जर एखाद्यानी हा Keyword गुगल मध्ये शोधला तर आपले पेज तिथे दिसावे यासाठी असलेला शब्द म्हणजे Keyword. याच Keyword वर आधारित जाहिराती गुगल आपल्या पेज वर पाठवते. अधिकाधिक उत्पन्न मिळवण्यासाठी अधिक लोक आपल्या पेज वर आली पाहिजेत. यासाठी keyword खूप महत्वाचा ठरतो, Keyword चा पोस्टमध्ये अधिकाधिक वापर जास्त गरजेचा असतो. यालाच केयवोर्द डेन्सिटि म्हणतात.

२. आपले काही पोस्ट हे फक्त काही जाहिरातींसाठी लिहावेत, जेणेकरून सर्वाधिक वाचक या पोस्ट वर येतील, तर काही पोस्ट हे Keyword वर आधारित लिहावेत.

३. विषयावर आधारित पोस्ट लिहावीत, ज्यामुळे योग्य त्याच जाहिराती पेज वर दिसतील. वाचकांना परत परत आपल्या पेज वर बोलावण्यासाठी लेखांची मालिका लिहावी.

४. आपल्या संकेतस्थळावरील पानांची संख्या वाढवावी, २ दिवसातून एकदा तरी एखादा लेख लिहावा.. जेवढी जास्त पानांची संख्या तेवढी आपल्या संकेतस्थळावर येणाऱ्यांची संख्या जास्त..

५. Google Adsense मधून योग्य अश्या जाहिराती निवडाव्यात, ज्या आपल्या संकेतस्थळाच्या रंगाशी समरस होतील. योग्य जाहिराती सर्वाधिक उत्पन्न देतात.

६. सर्वात महत्वाचे उत्पन्ना कडे न बघता , लेख लिहीत राहावे , संयम ठेवावा, आपल्याला याचा फायदा नक्की होईल.. आणि लेख हे फक्त जाहिरातींसाठी लिहू नयेत. काहीउपयोगी लेख लिहिले की त्यावर वाचक पण येतात आणि त्याद्वारे उत्पन्न पण मिळते..

# घर बसल्या पैसे कमवा...काय खरे काय खोटे



घर बसल्या महिन्याला ८ ते १० हजार कमवा, मार्केटिंग नाही, ऑफिस नाही, कोणतीही अट नाही, फक्त इंटरनेट कनेक्शन...

अश्या प्रकारच्या Advertise आपण रोज बघतो, कधी रेल्वेच्या डब्यामध्ये, तर कधी इंटरनेटवर..

पण काय हे खरे आहे...?

फक्त इंटरनेट वर रोज २-३ तास काम करून ८-१० हजार कमावता येतात...??

मित्रानो जर असे खरे असते...तर विचार करा...तुमच्या आजू बाजूला Computer Engineering केलेले, दिवसभर इंटरनेट वर बसणारी बेरोजगार किंवा नोकर्या शोधणारी मंडळी नसती दिसली..

पण याचा असा अर्थ होत नाही...की इंटरनेट वरून कमावताच येत नाही...

तुम्ही खरच कमवू शकता ८-१० हजार रुपये... ते पण फक्त २-३ तास काम करून...पण ते एवढे सहज आणि सोपे नाही आहे..

आणि त्यासाठी तुम्ही काय करता, तुमची शैक्षणिक पात्रता..यावर देखील हे अवलंबून आहे..

या साठी खूप मेहनत करण्याची तयारी पाहिजे...

जसे एखादे झाड लावताना ... ते झाड लावणार विचार करतो..या झाडाची फळे मला काही वर्षांनी मिळणार आहेत...अगदी तसेच..

पण त्यासाठी त्या झाडाची रोज निगा राखणे, त्याला पाणी घालणे..ही कामे तर करावीच लागतात...

खरे तर इंटरनेट वरून पैसे कमावण्याचे बरेच मार्ग आहेत...

यातील काही मार्ग..पुढील प्रमाणे..

१. Online Advertising(Google Adsense)

२. FreeLancing – स्वायत्त

३. Data uploading – संगणकावर महिती भरणे

४. Blogging – ब्लोग लिहिणे.

५. E-Commerce – इंटरनेट वर उत्तपादने विकणे..

अश्या प्रकारची अनेक कामे करून आपण इंटरनेट द्वारे पैसे कमवू शकतो..

वरील सर्वांची थोडक्यात माहिती देत आहे..

१. Online Advertising

आता Online Advertising हे सर्वांना परिचयाचे झाले आहे..अगदी ही माहिती वाचत असताना आजू बाजूला..ज्या Advertise दिसतात त्या आहेत Online Advertise … जेव्हा कोणीही वाचक, यावर क्लिक करतो त्याचा फायदा माहिती लिहिणार्याला अर्थात ब्लोग लिहिणार्याला होतो..

२. FreeLancing – स्वायत्त

इंटरनेट वरून एखाद्या कंपनीचे किंवा कोण एकाचे काम पैशाच्या मोबदल्यात करून देणे… म्हणजे FreeLancing ..

३. Data uploading – संगणकावर महिती भरणे

इंटरनेट वर अश्या अनेक कामाच्या संधी उपलब्ध आहेत जिथे संगणकावरून माहिती भरून पैसे कमावता येऊ शकतात..

४. Blogging – ब्लोग लिहिणे

सर्वात सोपा असा हा मार्ग आहे…जर तुम्ही एखाद्या विषयात पारंगत असाल, आणि तुम्हाला संगणकाची बेसिक माहिती असेल..तर हे तुमच्या साठी आहे..याविषयी आपण पुढील सदरात जाणून घेऊया…

५. E-Commerce – इंटरनेट वर उत्तपादने विकणे..

तुम्ही बनवलेल्या वस्तू, संपूर्ण जगात, देश विदेशात विकण्यासाठी हा सर्वोत्तम पर्याय …तो पण कोणतेही दुकान नसताना…

# आपण आणि आपली गावे

अरे कुणी चहा द्याल का चहा? !!! हे वाक्य कोणा नाटकातील नसून सध्या गावोगाव असलेल्या परिस्थितीचा परिपाक आहे. आपण गावाला जातो त्या वेळी तेथील अवस्था बघून अस्वस्थ होतो. जेथे पन्नास पन्नास घरे चालू होती तेथे आज बहुतेक गावात २-४ घरे ब्राह्मणाची राहिली



आहेत. इतर समाजाची अवस्था सुद्धा तशीच कठीण आहे. होळी आणि गणपती किव्वा सुट्यांचे दिवस सोडले तर गाव भुताने पछाडल्या सारखे दिसते. आपण जरी शहरात राहत असलो तरी गावाशी आपली नाळ जुडली आहे. आपले पूर्वज गावात जन्मल्या मुळे आणि आपली मुळ घरे आणि देव देवता गावात असल्यामुळे आपल्याला गावाबद्दल फार आपुलकी आहे. गावातील सध्या गंभीर परिस्थिती बघता. विचार करायची वेळ येते का हि अवस्था झाली असेल.

गाव पूर्वी बारा बलुतेदरनि बसलेले होते. बारा बलुतेदार म्हणजे बारा प्रकारचे कष्टकरी जसे कि सोनार, न्हावी, धोबी, कुंभार, सुतार, लोहार, चांभार, कोळी, मांग, ढोर, चौकीदार आणि गुरव तसेच ते १८ अलुतेदारानी नटलेले होते. १८ अलुतेदार म्हणजे तेली, तांबोळी, साळी, संगर, माळी, शिंपी, गोंधळी, भाट, डावर्या, ठाकर, मुलांनी, गोसावी, वाजंत्री, घडशी,



कलावंत, कोराव, तारल, भोई. (श्री क्षेत्र सिद्धगिरी मठ, कणेरी, तालुका करवीर, जिल्हा कोल्हापूर  येथे एका संग्रहालयात या विषयावर एक कायम स्वरूपी मेणा चे प्रदर्शन आहे तेथे आणखी माहिती घ्यावी). अशा प्रकारच्या विविध ज्ञानी आणि कष्टकरी माणसांनी भरलेला गाव स्वयंपूर्ण होता. गावातील प्रत्येकाला लागणाऱ्या वस्तू, सुविधा, सेवा आणि गरजा तेथेच उपलब्ध होत्या. शेतीमध्ये अधिक उत्पन्नासाठी केमिकल खते वापरत नव्हते त्या मुळ्ये शेतीचे उत्पन्न सुद्धा पुरेसे होत होते. मुख्य म्हणजे सर्व शेते लागवडीखाली होति.

मग इंग्रज्यांचा राज्यात, साचेबंद शिक्षण आले. हाती लोहाराचा घण जावून लेखणी आली. सुधारणेचा नावाखाली ज्याला साचेबंद अभ्यासात रुची नाही त्याला सुद्धा इंग्रजी, भूगोल, गणित, इतिहास वगैरे विषय घोकून पाठ करावे लागले. सोनार, शिल्पकार, लोहार, शाहीर, तांबट वगैरे मंडळीना हवे असलेले व्यवसायोपयोगी पारंपारिक शिक्षण मिळणे बंद झाले. लोकसंख्या वाढत चालल्यामुळे एक भाऊ सोडून बाकी सर्व रोजगारासाठी गावाबाहेर पडू लागले.त्याच वेळी कुळ कायद्याचा नावाखाली खोतांचा नावावर असणाऱ्या जमिनी कुळान कडे गेल्या आणि शेतीचे तुकडे झाले.  सरकारने छोट्या शेतकर्यांना शेती दिली परंतु निसर्गावर अवलंबून असलेली शेती व्यावसाईक दृष्ट्या न झाल्यामुळे (Economy of scale) एका चांगल्या योजनेचे बारा वाजले आणि शेतकरी शेतातून पसार झाला. त्यात शहरी गेलेले भाऊबंद आई वडिलानंतर गावातील भावाला विचारात नसल्यामुळे त्याला आपल्या संसारासाठी हात पाय हलवणे क्रमप्राप्त झाले व तो सुद्धा घराबाहेर पडला.. त्यातच इश्तेतीसाठी भाऊबंद आपसात झगडू लागले. जिवंत असताना भावाला न विचारणारे भाऊ तेराव्याला वाटणीला हजर झाले. जमिनी अल्प मोबदल्यात परकीयांचा हातात जाऊ लागल्या आणि उपजाऊ जमिनीवर धनिकांचे बंगले थाटले आणि तेथे गावातल्या भगिनी राखण करू लागल्या.

पायाभूत सुविधांच्या कमतरतेमुळे नवीन उद्योग शहरातच राहिले आणि मागास भागातील उद्योग फक्त कागदावरच राहिले.  त्यामुळे गावातील लोकांचे लोंढे शहरात येऊ लागले आणि गावे ओस पडू लागली. महात्मा गांधींचा स्वप्नामधील भारत स्वप्नामधेच राहिला. पंचवार्षिक योजनेमधील नियोजित सिंचन प्रकल्प २०-२० वर्षानंतर सुद्धा कार्यान्वित न झाल्यामुळे पाण्याअभावी शेते करपू लागली आणि शेतकरी हवालदिल होऊन आत्महत्या करू लागला. त्यात कोकणासारख्या वन श्रुष्टीनि नटलेला प्रदेश

ओस पडल्यामुळे सरकारी कृपेने माकडे आणि वानरे यांचे प्राबल्य माजले आणि उरले सुरलेले बागायती उत्पन्न सुद्धा शेतकऱ्यांचा हातातून निसटले. साहजिकच उत्पन्नापेक्षा जास्त खर्च होऊ लागल्यामुळे तरुण वर्ग गावाकडे पाठ फिरवू लागला. आज गावामध्ये रस्ते, वीज, पाणी, टेलिफोन, टीवी या सारख्या सुविधा होत आहेत पण उत्पादक लोकसंख्या कमी झाली आहे. गावातील देव देवतांचे संस्कार करायला माणसे नाहीत. मोठ मोठी देवळे आहेत पण कचरा काढायला माणसे नाहित. वार्षिक उत्सव झाल्यावर दोनच दिवसात त्याची प्रचीती येते. त्यातच शिक्षणा मुळे समज आलेल्या समाजा मध्ये वर्ग कलह वाढत चालला. एकमेकांचा नादाला लागून समाजाचे संबंध बिघडवण्याचे आणि असलेल्या परंपरांना जाणीवपूर्वक छेद देवून समाजामध्ये तेढ निर्माण करण्याचे प्रयत्न होत आहेत.

याला उपाय काय? परत आपली गावे गुण्या गोविंदाने नांदतील काय? उत्तर कठीण आहे. विकासाची गंगा जर शहरांकडून गावाकडे आली, गावाजवळच जर स्थानिक लोकांना रोजगार मिळाला, शहरातील पगार आणि गावातील पगार यातील तफावत दूर झाली, शेतीला पूरक जोड धंद्यांसाठी सरकारने कसून प्रयत्न केले आणि पायाभूत सुविधा आणि शिक्षण, आरोग्य इत्यादी सुविधा गावागावात पोहोचल्या तर कदाचित परत गावे सुजलाम सुफलाम होतील अशी आशा करून आपला निरोप घेतो अशा गावात परत यायला,

माधव गणेश भोळे (भ्रमण ध्वनी ८४५१८८६७५९)



नातु: आज्जी मि रनींग रेस मध्ये भाग घेतलाय आशिर्वाद दे मला
आज्जी: सावकाश पळ रे बाबा!!

एक नवरा त्याच्या गरोदर बायकोला Hospital मध्ये
घेऊन जात होता....

एक माणूस : तुमच्या मिसेस का?..

नवरा : हो..!..

माणूस : Pregnent आहेत काय??..

नवरा : (रागाने) नाही Football गिळलाय तीने...
व्हा बाजुला..

नदी किनारी जोडपे बसलेले असते



प्रेयसी : तुझा काय प्लॅन आहे

प्रियकर : तोच ग ....

२५पैसा १ मिनीट

प्रेयसी : मर मेल्या मोबाईल मधेच





# मराठ्यांनो भविष्यावर बोलू काही

शिवजयंतीचा दिवस आणि मंडळांचा जल्लोष हे ठरलेलं गणित आणि त्यात फोडणी म्हणून कि काय, तोंडावर आलेल्या निवडणुका.
मग काय राजकारण्यांची पैशांची उधळपट्टी आणि मंडळांची हाय-बजेट शिवजयंती.
ऑफिसमधून सुटलो आणि त्याचीच प्रचीती आली.
शिवजयंतीचा सरळ आणि सोपा हेतु,

*लाखाचा पोशिंदा, आपला जाणता राजा*
*शिवबाला काळापलीकडे नेऊन,*
*त्याची जीवनगाथा मराठ्यांच्या*
*पिढ्यानपिढ्यापर्यंत पोहोचावी,*
*प्रत्येक मराठ्याच्या रक्तात शिवबा दौडावा,*
*आणि मराठ्यांचा इतिहासच नव्हे तर*
*चाललेला वर्तमान आणि येणारा*
*भविष्यकाळही उज्ज्वल व्हावा*

पण जेव्हा एके ठिकाणी ध्वनिक्षेपकाची भिंत शिवारायांपुढे उभी करून त्यापुढे bolly-wood संगीतावर नाचत,
ह्याच हेतूला पायदळी तुडवणारी मंडळी दिसली तेव्हा तळपायाची आग मस्तकाला गेली.

त्याचवेळी आमच्या धनकवडीच्या बस स्टॉपला पोवाड्यांचे बोल कानावर पडले आणि पावले आपोआप तिकडे वळाली.
शिवजयंतीनिमित्त इकडे मात्र शाहीर मंडळीना बोलविले होते.
महाराजांच्या शौर्याची आणि कार्याची महती आणि त्यातून प्रबोधन हे गणित शाहिरांना चांगलंच जमलं होत.
शिवरायांचे व्यापाराविषयी धोरण, त्यांचे स्त्रीशक्तीविषयी धोरण आणि त्यातून आजच्या समस्यांचे निराकरण.

शिवरायांनी मुघल सुभेदाराच्या सुनेला सन्मानाने परत केल्याचे वर्णन,
स्वराज्य निर्माता शिवाला घडविणारी स्त्री

शक्ती जिजाऊ, यातून प्रबोधन करणारा शाहीर, संतश्रेष्ठच.

शाहीर आणि सोंगाड्याचा एक संवाद मात्र लय भारी वाटला.



शाहीर : नर आणि मादी म्हणजे संसाराच्या रथाची दोन चाक
सोंगाड्या : आव शाहीर लोकांना समझल, आसच बोला
शाहीर : काव, काय झालं?
सोंगाड्या : शाहीर आजच्या घडीला रथ कुठ दिसतो का?
शाहीर : मग कारचं उदाहरण द्यावं म्हणता?
सोंगाड्या : कार काय आज आहे उद्या पेट्रोल संपल की कारचं रथासारख व्हायचं. माझ्याकड अनंत काळ टिकल आस उदाहरण आहे.
शाहीर : आणि ते कोणत?
सोंगाड्या : सायकल शाहीर. नर आणि मादी म्हणजे सायकलीची दोन चाकं.
नर म्हणजे पुढचं आणि मादी म्हणजे मागचं चाक(हात झटकून, तोंड वाकड करीत).
शाहीर : आणि ते कस काय?
सोंगाड्या : त्याच आस आहे, हांडेल कुठल्या चाकाला आसत?
शाहीर : पुढच्या
सोंगाड्या : तेच की, म्हणजे पुढच चाक जिकड जातंय, मागच चाक आपल त्याच्या माग माग.
शाहीर आता हे सांगा, काही भार वाहून न्यायाचा झाला तर आपुन carriage वापारतो.
ते कुठ असतं?
शाहीर : मागच्या चाकावर.
सोंगाड्या : तेच की, सगळा भार मागच्या चाकावर, पुढच चाक आपल मोकळ कुठही जायला.
आता सायकल कुठ लावली, तर कुलूप कुठल्या चाकाला लागतं?
मागच्याच कि! पुढच चाक आपल मोकळ कुठही जायला.
शाहीर : तुमचा पुरुषी अहंकार बराच माजलेला आहे राव.
आता तुम्ही एका गोष्टीचं उत्तर द्या.
सायकलला ब्रेक कुठल्या चाकाला आसतो?
तो दोन्ही चाकांना आसतो खरा. पण जर पुढचा दाबला, तर काय व्हतं हे सांगण्याची गरज नाही.

मागच्या चाकाच्या ब्रेक मूळंच, तुमच्या मनमोकळ्या वागण्यानी तुम्ही गोत्यात येऊन तोंडावर आपटत नाही.
त्यामुळ लक्षात ठेवा,
जिजाऊ नसत्या तर शिवबा नसता आणि स्वरज्यही नसतं.

त्यामुळ हे पुरुषी अहंकाराच खूळ डोक्यातून काढा, स्त्री भ्रुणहत्या करू नका.

स्त्री हि अनंतकाळची माता आहे आणि ती नसली तर समाजात अराजक माजल्याशिवाय राहणार नाही.
स्त्री शक्तीचा विजय असो!!!

फडफड फडफड फडकतो भगवा झेंडा गगनात,
फडफड नाही तडफड हवी मराठी रक्तात,
हर हर महादेव !!! हर हर महादेव !!!

तात्या



# आठवण(एक शाळेतील गोष्ट)




दुपारची वेळ होती. मी, माझ्या समोरील असलेल्या खिडकीतून बाहेर बघत होतो. बाहेर रखरखीत उन पडले होते. सर्वांचा लंच झाला होता. डोळ्यावर एकप्रकारची तंद्री आलेली. सकाळच्या सत्रात सर्वांनी आपापली कामे बऱ्यापैकी उरकलेली होती. ऑफिसमध्ये साहेबसुद्धा नव्हते त्यामुळे सर्वाना आता आराम करण्यासाठी वेळ मिळाला होता. बाहेरचे उन डोळ्यांना त्रास देत असले तरी आतील ए.सी. च्या वाऱ्याने अंगावर काटा उभा राहत होता. अशा या वातावरणात ऑफिसमध्ये सगळे सुममध्ये असताना अचानक बाहेर अंधार दाटून आला.

कोणाच्याही मनी नसताना ते आभाळ एकदम पावसाचे ढग घेऊन आले. त्याचबरोबर सर्वांमध्ये एक उत्साह निर्माण झाला. अचानक जोराचा वारा सुटला अन वीज गेली. सगळीकडे अंधार पसरला. सर्वांनी आपापले कॉम्पुटर धडाधड बंद केले. सर्वजण येणाऱ्या पावसाची उत्सुकतेने वाट पाहू लागले.

"स्यान, ती खिडकी उघड ना!" केसी माझ्या समोरच्या खिडकीकडे हात दाखवत म्हणाली.

मी मागे वळून एकदा तिच्याकडे पहिले. तिच्या चेहऱ्यावर आनंद ओसंडून वाहत होता. मला वाटले आता जर पाउस आला तर ही नक्कीच त्या पावसात भिजणार. मी हसत हसतच माझ्या समोरची खिडकी उघडली. खिडकी उघडताच गार वारे आतमध्ये येऊ लागले. थोड्याच वेळात पाउस पडायला सुरवात झाली. समोर खूप मोठे झाड असल्यामुळे डायरेक्ट आभाळातून पडणारा पाउस आम्हाला पाहता येत नव्हता. त्या झाडावरून पडणारे मोठे मोठे पावसाचे थेंब पाहत व त्या थेंबामुळे होणारा आवाज ऐकत आम्ही बसून

राहिलो.

पाउस एकसारखा चालू होता. पावसाचे थेंब खिडकीच्या गजावर आढळून त्याचे तुषार माझ्या चेहऱ्यावर येत होते. एव्हाना माझी सुस्ती केंव्हाच गेली होती. केसीला लांबून पावसाची मज्जा घेता येईना, त्यामुळे ती माझ्या शेजारी आली व पावसाचे उडणारे थेंब हातावर झेलू लागली.

"केसी, तू आता एवढी मोठी झालीस, पण पाउस आला की तू खूप लहानगी होवून जातेस" मला त्या पावसाच्या थेंबाबरोबर खेळणाऱ्या केसीकडे बघून खूप हसू येत होते.

"स्यान, हा पाउस ना! अगदी माझ्या लहानपानाचा सोबती आहे. मी लहान होते त्यावेळेस या पावसात मी मनसोक्त भिजायची. त्यावेळेस माझी आई मला खूप रागवायची कारण दुसऱ्या दिवशी मला सणकून ताप आलेला असायचा. हे असे प्रत्येक वर्षी, प्रत्येक पावसळ्यात व्हायचे. या अशा पावसात दरवर्षी भिजत भिजतच मी लहानाची मोठी झाले. पण माझी ना, पावसात भिजायची हौस काही कमी नाही झाली". केसी तिचा हात तसाच त्या पावसांच्या थेंबात धरत म्हणाली.

तिच्या हातावरून परत उडणारे तुषार आता माझ्या चेहऱ्यावर येऊ लागले. मला तिचे हे रूप कधी माहीतच नव्हते. नेहमी कामात स्वतःला गुंतवलेली केसी इतकी भावनाशील आहे यावर माझा विश्वासच बसत नव्हता. मी तिच्याकडेच पाहतोय हे समजल्यावर मला केसी म्हणाली,

"आणि तू? तुला सांग ना कसा वाटतो हा पाउस? तू नेहमी दुसऱ्यांचे ऐकून घेत असतोस. कधी स्वतःबद्दल सांगत नाहीस".

"मी! मी काय सांगू? केसी, मला नाही इतरांसारखे मन मोकळे करता येत. मी अगदी साधाभोळा आहे ग, अन मी काय सांगणार." मी रुमालाने चेहऱ्यावरील तुषार पुसत म्हणालो.

पावसात भिजणारे हात तसेच ठेऊन केसी म्हणाली,

"हां, तू साधाभोळा आहेस यात शंकाच नाही, पण तुझे डोळेच सांगताहेत की, तुझ्याकडे सांगावयास खूप काही आहे. अगदी कोणत्याही क्षणी तुझ्या मनाचा बांध फुटू शकतो. पण कदाचित ज्याच्याजवळ सांगावे अशी व्यक्ती तुला आजपर्यंत भेटलीच नसेल."

"केसी, आर यू ब्लाक्मेलिंग मी?"

"आय डोंट थिंक सो, स्यान, पण इट इस टू"

हो, हे नक्कीच खरे होते. कदाचित माझ्या समोर आजपर्यंत अशी व्यक्तीच आली नसावी जिच्यासोबत माझे मन मोकळे झाले. पण केसीने मला आज बरोबर पकडले होते. मी तिला नेहमीची उडवा उडवीची उत्तरे दिली, पण केसीने मला बरोबर ओळखले होते. आता

मला गप्प बसता येणार नव्हते. आणि मग मी विचार करू लागलो.

सगळीकडे अंधार होता. ऑफिसमध्ये सगळे सूम होते. बाहेर पाउस पडत होता. केसीचे हात पावसात भिजतच होते. त्यांचे तुषार चेहऱ्यावर येत होते. ए.सी. चा थंडावा केव्हाच गेला होता. आता नैसर्गिक गारवा आला होता. केसी माझ्या डोळ्यांत डोळे घालून डोळ्यानीच मला म्हणत होती, "बोल ना बावळट!" अन मी विचार करत होतो. मागे मागे जात होतो. माझ्या भूतकाळात. अगदी माझ्या लहानपणात, बालपणात. माझ्या विचाराबरोबरच भूतकाळाचे चक्र फिरत फिरत मागे गेले आणि जिथून माझ्या बुद्धीची स्टोरेज व्हायला सुरवात झाली शेवटी तिथे जाऊन थांबले आणि माझ्या मनातील सर्व अलगद माझ्या ओठांवर आले...

संतोष सावंत

जेव्हा ते म्हणतात हे अशक्य आहे , तेव्हा लक्षात ठेवा अशक्य त्यांच्यासाठी आहे तुमच्यासाठी नाही

# दुष्काळातील भेगा

त्या पाषाणी आंधळ्या विहिरी
तिच्या देहावरीच्या भेगा
ह्या संकटी विठ्ठल दर्शनी
व्याकुळली हि चंद्रभागा...

तो मुलखाचा अन्नदाता
का त्याच्याच उराला फटके...

फांद्यांना विरह हिंदोळ्याचा
दोऱ्यांचे काम बदलले नाही



गिधाडांच्या बागा सजल्या
चातक हि विसरला रस्ता
ती गायी वासर निर्वसली
प्रेतांनी वसविल्या वस्त्या...

का त्याचेच नशीब फुटके
का त्यालाच उन्हाचे चटके

होती सवय किलबिलाटाची
आता किंकाळ्यांचा आसरा....

भविष्याचे डोळे पाणावले
तिथले भयानक दृश्य पाहून
अनेकांनी वर्तमान आवळले
कोरडल्या गळ्याचे माप घेऊन...

अनंत

# गोष्ट मराठीबोलीची

मराठी भाषा ही सधन भाषा आहे ती या भाषेतील साहित्यामुळेच, आपण आजकाल अनेक चर्चा सत्र ऐकतो मराठी भाषा टिकली पाहिजे त्यासाठी मुलांना मराठी शाळेत पाठवले पाहिजे ...

पण एखाद्या भाषेचा खरा प्रसार होतो तो त्या भाषेतील साहित्यामुळे, पुस्तकांमुळे.

पण ...

काही वर्षांपूर्वी मराठी पुस्तके मिळवणे हे खूपच कठीण काम होते, कारण मराठी भाषेतील पुस्तके ही फक्त पुणे, मुंबई, कोल्हापूर, नागपूर अशा काही निवडक शहरांमधील निवडक दुकानांमधेच उपलब्ध होती. मग अशा परिस्थितीत मराठी साहित्याचा भाषेचा प्रसार कसा होणार? लहान मुलांनी मराठी पुस्तके वाचलीच नाहीत तर त्यांना मराठी भाषेचे महत्व कसे समजणार. सुहास शिरवाळकर, रत्नाकर मतकरी यांच्या  गूढ कथा कित्येक इंग्रजी कथांपेक्षाही सरस आहेत, पण हे समजण्यासाठी आपण ही पुस्तके वाचली पाहिजेत आणि त्यासाठी ही पुस्तके उपलब्ध झाली पाहिजेत या एकमेव संकल्पनेतून मराठीबोली.कॉम (marathiboli.com) या संकेतस्थळाची निर्मिती झाली.

मी स्वप्नील समेळ, मी संगणक तंत्रज्ञ आहे आणि माझा मित्र सुमित खेडेकर हा वाणिज्य शाखेचा पदवीधर राहणार खोपोली, त्यामुळे अभ्यासाची पुस्तके सोडून इथल्या दुकानांमध्ये काहीच मिळत नाही. ही समस्या फक्त खोपोलीची नव्हती ही समस्या महाराष्ट्रातील अनेक छोट्या शहरांची अथवा गावांची होती. म्हणूनच आम्ही मराठीबोली.कॉम ची निर्मिती करण्याचा नीच्छय केला ते साल होते २०११.

तेव्हा मी बायर इंडिया या कंपनीमध्ये ठाण्याला नोकरी करत होतो, त्यामुळे खोपोली ते ठाणे रोजचे जाऊन येऊन ५ तास प्रवासात जायचे, त्यामुळे वेळ खूपच कमी होता तरी हे संकेतस्थळ म्हणजे एक जुनून होता त्यामुळेच वेळेचा किंवा पैशांचा अडथळा मध्ये आलाच नाही. उदीष्ट एकच होते मराठी वाचकांपर्यंत मराठी पुस्तके पोहचवणे.

मी संगणक अभियांत्रिक असल्याने संकेतस्थळ बनवणे तसे काही अवघड काम नव्हते, पण अवघड कामे सुरु झाली त्या नंतर.

सर्व प्रथम आम्ही वकिलाच्या मदतीने पार्टनरशिप डीड बनवली, त्यानंतर

नगरपालिका कार्यालयाकडून दुकानाची नोंदणी केली, आमचे तसे कधीच दुकान नव्हते पण ही नोंदणी आवश्यक होती.

आता संकेतस्थळ तयार होते आणि सर्व सरकारी कामे पण झाली होती, प्रश्न होता पुस्तके?

मग आमच्या पुण्यातील प्रकाशकांकडे फेरया सुरु झाल्या, काहींनी मदतीचे आश्वासन दिले तर काहींनी फक्त छापील पुस्तकांची सूची हातात दिली.

२-३ महिन्यांच्या कालावधी मध्ये आम्ही एकूण ५००० हून अधिक पुस्तके आणि १० हून अधिक प्रकाशक मराठीबोलीशी जोडले.

आणि शेवटी तो दिवस ठरला ११.११.११




म्हणजेच ११ नोव्हेंबर २०११ रोजी खोपोलीतील रुशीवन या एका नामांकित हॉटेल मध्ये खोपोलीतील १०० मान्यवरांच्या उपस्थितीत, संजय आवटे (त्यावेळचे कृषीवल या दैनिकाचे संपादक आणि आत्ताचे साम टीव्ही चे संपादक) यांच्या हस्ते मराठीबोली.कॉम चे उद्‌घाटन करण्यात आले. प्रशांत देशमुख (प्रसिद्ध शिव व्याख्याते) हे कार्यक्रमाचे प्रमुख पाहुणे होते.




फक्त २०००० रुपयांच्या भांडवलावर मराठीबोली.कॉम ची निर्मिती करण्यात आली होती. मराठीबोली.कॉम हे ना नफा ना तोटा या संकल्पनेवर आधारित असल्याने आमची जाहिरात आमचे ग्राहकच करत होते.

पहिल्याच ६ महिन्यांमध्ये आम्ही गुंतवलेल्या भांडवला एवढा नफा मराठीबोली.कॉम नी मिळवला आणि पूर्णपणे स्वयंपूर्ण संकेतस्थळ सुरु झाले.

मराठीबोली.कॉम मधून मिळवलेला नफा पुन्हा

संकेस्थळासाठीच वापरण्याचे आम्ही ठरवले आणि २०१४ मध्ये मराठीबोलीला पुन्हा एकदा नवीन रुपात नवीन तंत्राच्या मदतीने अद्ययावत करण्यात आले.

मधील कालावधीमध्ये मराठीबोली.इन (marathiboli.in) या मराठी लेखकांसाठी असलेले संकेतस्थळ आणि त्यानंतर मराठीब्लॉग्स.इन (marathiblogs.in) हे मराठी ब्लॉगर्स साठी असलेले संकेतस्थळ आम्ही सुरु केले.

अनेक मराठी ब्लॉगर्स ना त्यांच्या ब्लॉगमधून उत्पन्न कसे मिलावावे याचे विनामूल्य मार्गदर्शन मराठीब्लॉग्स.इन मार्फत केले.

लवकरच मराठीबोली.कॉम वर ५०००० हून अधिक मराठी पुस्तके उपलब्ध करून मराठी पुस्तकांचे सर्वात मोठे ऑनलाईन संकेतस्थळ सुरु करण्याचा आमचा मानस आहे.

आता तुम्ही म्हणाल नफा मिळवायचा नव्हता तर व्यवसाय कशाला सुरु करायचा, तर याला माझे उत्तर असेल नफा कमावणे हे आमचे उदीष्ट नव्हते आणि नसेल पण जेव्हा तुम्ही एक उंची गाठता तेव्हा नफा कमावण्याचे अनेक पर्याय तुमच्या समोर उभे राहतात. पण पहिल्या दिवसापासून नफ्याचा विचार केला तर त्याचा नकारात्मक परिणाम होऊ शकतो.

आज मराठीबोली जाहिरातींच्या माध्यमातून नफा मिळवत आहे, त्यामुळे मराठी पुस्तके सर्वात कमी दरात मराठी वाचकांपर्यंत पोहचवणे हे उदीष्ट असून देखील मराठीबोली नफ्यामध्ये आहे. लवकरच आमचे कपड्यांचे ओनलाईन दुकान सुरु होत आहे.

नवीन उद्योजकांना एवढेच सांगीन, तुमचे उदीष्ट नक्की ठेवा, नफा कसा होणार याचा विचार आत्ता नको, आधी उदीष्ट गाठा, नफा होणारच. जे काही कराल त्यामध्ये काहीतरी वेगळे करा इतर उद्योजक जे करत आहेत तेच तुम्ही केलेत तर तुमच्यात आणि त्यांच्यात फरक तो काय, तुमचा त्यांच्यासमोर टिकाव कसा लागणार. म्हणूनच स्वतःची आयडीयाची कल्पना घेऊन या, व्यवसायात नक्कीच विजेते व्हाल.

स्वप्नील

**आळस हा माणसाचा कॅन्सर!**

कर्करोग (कॅन्सर) हा वेगाने पसरत जाऊन शरीरातील चांगल्या पेशी, अवयवांना ग्रासून टाकतो . पुन्हा पुन्हा उपचार करूनसुद्धा हा कर्करोग आटोक्यात येण्याची शक्यता कमीच असते. प्रथमावस्थेत तो ओळखू येत नाही. ओळखू येण्याच्या टप्प्यावर नियंत्रण ठेवणे कठीण जाते. तसेच आळसाचे असते, आळस हा संपूर्ण व्यक्तिमत्वाचा ताबा घेतो. नंतर त्याच्यावर उपचार करण कठीण कार्य होत वा निष्पन्न काहीच होत नाही.

# बलात्कार ...बलात्कारी ......!!!!!

काहीही करून आज आपण हा सिनेमा पूर्ण पाहायचाच ...! गेल्या पंधरा वर्षात आपण हा सिनेमा पूर्ण पाहूच शकत नाही .... का ...? पण आज पाहायचाच असा मनाचा निश्चय करुनच टिव्ही समोर बसले

घरात अर्थात माझ्याशिवाय कुणी नव्हते .... ! सर्व दारं खिडक्या नीट बंद केल्या आणि मनाचा हिय्या करून

मी टिव्ही समोर सिनेमा पहायला लागले ...... !

आणि जस जसा सिनेमा पूढे सरकत होता, आणि तो विशिष्ट सीन येण्याची वेळ जवळ येत होती तस तसा माझा माझ्या मनावरील आतापर्यंतचा ठेवलेला ताबा सुटायला लागला ... माझ्या छातीत धडधड सुरु झाली ...कितीही कंट्रोल करीत असतांनाही डोक्याला झिनझिन्या येउ लागल्या होत्या . आणि तो सीन सुरु झाल्या बरोबर आपोआपच माझे अवसान गळाले ...आणि मी रिमोट्चा ऑफ बटन दाबले .... !!मी पुन्हा एकदा "तो" सिनेमा अर्धवट सोडला होता ...!!!

"तो " सिनेमा म्हणजे "बैंडिट क्वीन " जो मी आजही पूर्ण पाहू शकत नाही "फूलनदेवी " या



एक सर्वसामान्य मुलीचा "बैंडिट क्वीन"दरोडेखोर होण्या पर्यन्तचा जीवन प्रवास हा या चित्रपटाचा विषय आहे .आजही या चित्रपटातील "तो " बलात्काराचा सीन पहायची हिम्मत माझ्या जवळ नाही ...! पण हल्ली तर रोज सकाळी उठल्या पासून एक नाही तर अनेक "स्त्री" वरील लैंगीक अत्याचाराच्या बातम्या ऐकुन मनाच्या

संवेदना भेदरून जात आहेत .आज एक स्त्री म्हणून विचार करताना स्त्रीच्या शरीराची चाललेली वीटम्बना कशाचा परिपाक आहे ....?

एका बाजुला एकविसाव्या शतकाच्याआगमनाचे ढोल वाजवीत नव्या संगणक आणि युगाच्या पहाटेची वाट पहात आहोत ....! विलक्षण प्रगत अश्या तंत्रयुगाच्या आगमनाची वाट पहात आहोत . स्त्रीया आज शिकत आहेत .... शिकवित आहेत ...!भारता सारख्या अतिपारंपारिक देशात स्त्रीया पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून नवनवीन क्षेत्रं पादांक्रात करीत आहेत, पण तरीही ...पण तरीही प्रश्न उरतोच ..."आजची आधुनिक स्त्री खरंच "माणूस " म्हणून संपूर्ण समाजाकडून स्वीकारली गेली आहे ...?

अजुनही स्त्रीचे "वस्तुपण" संपलेले नाही . तिच्यावरील अन्याय अत्याचाराचा तपशील बदललाय ... !पण त्यामागचे पुरुषीमन तेच आहे . कदाचित अधिक विकृत झालेलं आहे .... !म्हणुनच समाजातील पुरुषी विचारसरणी , मानसिकता महाभारत कालिनच आहे . आजच्या दिल्ली , मुंबई मधील बलात्काराच्या घटना कशाच्या द्योतक आहेत ... ! महाभारतात द्रौपदी , ययाति पुत्री माधवी यांच्यावरील पुरुषी वर्चस्वाच्या कहाण्या सर्वश्रुत आहेत ....! आणि आजही कितीतरी द्रौपदी, माधवी यांचे शील हरन केले जात आहे . स्त्रीमनाचा आणि तिच्या भोवतीच्या वास्तवाचा कुणीतरी , कधीतरी वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे का .... ....? जेंव्हा एखाद्या स्त्रीवर अत्याचार करून तिच्या शिलाचा , तिच्या कौमार्याचा भंग केला जातो तिची ती पीडा कोण लक्षात घेते ....? स्त्रीवर असा घृणास्पद अत्याचार करणा-या पुरुषाची मानसिकता , ह्या क्रौर्य मनाचा पोत पुरुष मनच ओळखू शकतात ...! कारण स्त्रीची शील हरना नंतरची नव्हे ती शील हरना पूर्वीची मानसिकता मी तो "बैंडिट क्वीन " सिनेमा पहात असताना अनुभवली आहे ...! तर प्रत्यक्ष असा घृणास्पद प्रसंग ज्या दुर्दैवी स्त्रीवर गुदरला आहे .... तिच्या मनाची पीड़ा कशी असेल ...??? स्त्रीच्या कौमर्याचे लचके तोड़नारे ही गिधाड़ेच आहेत ....! स्त्रीच्या मनाची आणि देहाची विटंबना करणारे हे नरभक्षक आहेत। समाजात एकुणच समाज व्यवस्थेत स्त्रीचे चारित्र्यहनन करणे या इतकी सोपी गोष्ट नाही। "स्त्री म्हणजे पैर की जुती " किंवा स्त्रीचे शील म्हणजे काचेचे भांडे .... एकदा तडकले की परत सांधता येत नाही ..." हे या समाज व्यवस्थेतील स्त्रीयांबाबतीतील अलिखित नियम आहेत ....! याच पुरुषी मानसिकतेतुन स्त्रीला नेहमीच दुबळ समजुन दाबलं आहे ... ! "भोगाची वस्तु " हेच तिचं मूल्य आणि समाजव्यवस्थेतील स्थान होउ पहात आहे ...! आजकाल स्त्रीयांवरील अत्याचाराच्या घटनांमधे लक्षणिय वाढ झाली आहे . परत एकदा स्त्री घराच्या उंबरठयाआड़ लपून राहिली तरच ती " सुरक्षित " अशी स्थिति या विकृत समाजाने स्त्रीवर आणली आहे ... !

" स्त्री"आदिम काळा पासून स्वतःच्या केवळ "स्व" साठी नाही तर स्वतःच्या मन्युष्यवत अस्तित्वासाठी लढत आहे। तिने आजही हक्क ओरबाडून मिळवले नाहीत तर स्त्रीत्वाच्या सर्व

परिसीमा भेदुन पुरुषी सामर्थ्याच्या सर्व शक्यतां पर्यन्त स्वत:ला सिध्द करून मिळवले आहेत. ....! मग “संभोग ” हाही तिचा स्वत:चा हक्क का असू नये...? तिथेच मात्र तिला घरी दारी हक्क नाकारला जातो . माणुसपणाच्या पुढाकारान कधीच का घडू नये संभोग ... ! या विकृत समाजाकडून तोच तिचा हक्क ओरबाडून घेतला जात आहे ....!! तिचे लचके तोडले जात आहेत ....!

खरे तर या देशातल्या सर्वसामान्य माणसाला स्त्री-पुरुषांना ख-या अर्थाने समानतेच्या जगात आणण्यासाठी आवश्यक ती मानसिकता , शैक्षणिक आणि आर्थिक पात्रता प्राप्तच होउ नये अशा दिशेने सगळा प्रवास चाललेला दिसतो . त्यामुळे कायदे , आयोग असोत की प्राचीन काळापासून चालत आलेली स्त्री गौरवाची सुभाषिते असोत, यांचा कितीही वर्षाव झाला तरी स्त्रीची परिस्थिति प्रत्यक्षात किती बदलली ...?बदलते?

पण संघर्ष अटळ आहे.! आणि तरीही

नदी,धरती ,आग, हवा ही सर्व स्त्री रूपं आहेत , शतकानुशतकांच मौन मोडून जेंव्हा ती आक्रोश करतील तेंव्हा “भोगण” या शब्दाचा आविष्कार काय असतो त्याचा प्रत्यय सा-या जगाला येइल आणि त्याच दिवशी जगाला कळेल पुरुष प्रधान व्यवस्थेत काय अर्थ असतो “स्त्री” असण्याचा आणि का व्याकुळ होते मन जेंव्हा तिचं माणूसपण अमानुषपणे नाकारलं जातं आणि केवळ शरीर भोगलं जातं ...! आणि त्याच दिवशी रुजतील समाजात तिच्या विषयीच्या आस्था , दृढ़ता , प्रीती , आशा , निष्ठा , प्रार्थना , वेदना आणि उदारता ...!!!!

कारण .......

“स्त्रीच आई आहे ,
सावित्री आहे ,
राधा आहे,
आणि दुर्गाही आहे ......!!!!!

” समिधा”



एक माणूस मच्छिवालीला- "ए मावशी, या सुरमई मध्ये गाबोळी (अंडी) आहे का ? "

मच्छीवाली- "ए बाबा, भाऊच्या धक्क्यावर म्हावरं वजन करुन देतात', सोनोग्राफी करुन नाय......... !"

रोज दवाखान्याच्या भायर उभो दिसणाऱ्या झंप्याक देशपांडे डॉक्टरीण बाई एक दिवस आत बोलवता.
देशपांडे: काय रे, रोज तिथे उभा राहून दवाखान्यातल्या बायकांना बघत
राहतोस, लाज नाही वाटत? बेशरम.

झंप्या: बाईनू ,तुम्हीच भायर बोर्ड लीवन ठेवलास...

"स्त्रियांना पहाण्याची वेळ स.९ ते ११."

# जीवन

जीवन म्हणजे काय ? हा प्रश्न आपल्याला नेहमी पडतो. जीवन म्हणजे नक्की काय ? जीवनाची व्याख्या अशी आहे की, एखादा जीव जन्माला आल्यापासून ते मरेपर्यंतचा जो प्रवास असतो



त्याला जीवन म्हणतात. एखादा जीव जन्माला आल्यानंतर त्याच्यासमोर अनेक प्रकारची संकटे येतात. आणि जो त्याच्यावर आलेल्या संकटांना धैर्याने, धाडसाने झगडून त्या संकटाशी सामना करतो तोच त्याच्या जीवनात यशस्वी होतो. आपल्या या जीवनातल्या प्रवासात माणूस हा एकटाच येतो आणि जातानाही एकटाच जातो. या जीवनात माणसाला खूप अनुभव येतात. या अनुभवातूनच माणूस कसे जीवन जगायचे हे ठरवतो. माणूस आपले हे जीवन ध्येयासाठी जगतो. कारण प्रत्येक माणसाचे काही ना काही ध्येय असते. माणूस आपले हे जीवन आपले ध्येंय पूर्ण करण्यासाठी घालवतो.

या जीवनात आपल्याला खुप काही करण्यासारखे असते पण आपले त्याकडे लक्ष नसते. आपण आपले जीवन आपल्यासाठी जगणे असे नाही आपण दुसऱ्यासाठी जगायला हवं. जी माणसं स्वत:साठी जगतात ती आयुष्यभर सुखी होत नाही आणि जी माणसे जन्माला आल्यापासून ते मरेपर्यंतच्या प्रवासात अर्थात या जीवनात दुसऱ्यांसाठी जगले त्यांचे दु:ख आपले समजून दु:ख वाटून घेतले. प्रत्येक संकटात मदतीचा हात दिला. असे जर जीवन जगले तर आपले जीवन खूप सुंदर बनून जाईल. प्रत्येक माणसाला या जीवनातल्या प्रवासात सुख-दु:खाचे अनुभव येतात. आपले हे जीवन ऊन-सावलीप्रमाणे असते. आपल्या जीवनात सुख-दुख येत असतात. जीवनात सुखापेक्षा दु:ख अधिक असते. आपण या दु:खाला घेऊन बसण्यापेक्षा त्या दु:खाला सामोरे जावे म्हणजे आपल्या जीवनात सुख येईल.

सुख हे क्षणभंगूर असते. आपल्या आयुष्यात आपण हसत-खेळत सुख-दु:खाची गाणी गायची असतात. प्रत्येकाला दु:ख असते. गरिबांना दु:ख असते आणि श्रीमंतांनाही दु:ख असते. जरी तो खूप श्रीमंत जरी असला जरी अमाप संपत्ती त्याच्याकडे असली तर त्याला सर्व सुख मिळाले असे होत नाही. पैशाने सर्व सुख विकत घेता येत नाही. श्रीमंत माणूस कोणत्या ना कोणत्यातरी कारणाने दु:खी असतो. पण गरिबांना अनेक प्रकारची दु:ख असतात. दु:ख कसे झेलावे हे त्यांना माहित असते. गरिब माणसे समाधानवृत्तीचे असतात. जे आहे त्यातच समाधानी आहे असे ते मानतात. त्यामुळे ते श्रीमंतांपेक्षा जास्त सुखी असतात. आपले हे जीवन एका फुलाप्रमाणे असते. ते फुल मिळविण्यासाठी आपल्याला त्या काट्यांचा सामना करावा लागतो. त्यानंतर ते फुल आपल्याला मिळते. अशाचप्रकारे जीवनात आपल्याला सुख मिळविण्यासाठी आपल्याला अनेक संकटांना सामोरे जावे लागते. यातच आपल्याला जीवन म्हणजे काय असते हे कळते.

कवी पु. ल. देशपांडे यांनी
आपल्या काव्यरचनेत म्हटले आहे की, ‘जीवन हे खूप सुंदर आहे, ते थोडं जगून तर बघ.’ जीवनात सुख-दु:ख ही येतंच असतात. म्हणजेच आपण चिमुटभर दु:खाने न कोसळता, दु:खाचे पहाड चढून बघावे. दु:खाचे पहाड चढल्यावर आपल्याला यश हे मिळतेच. आपल्या जीवनात अपयश हे येतंच राहते. पण त्या अपयशाकडे आपण निरखून पाहीले पाहिजे. तेंव्हा आपल्याला जीवनात यशस्वी होता येते. अपयश ही यशाची पहिली पायरी असते. आपल्याला घरटं बांधणं सोपं वाटतं. पण ते घरटं बांधण्यासाठी जी मेहनत घ्यावी लागते ती कष्टदायक असते. आणि कष्ट केल्याशिवाय जीवनात आपल्याला कधीच सुख-समाधान मिळत नाही. माणसाला कोणतेही दु:ख आले की, माणूस लगेच मरणाचा विचार करायला लागतो. त्याला ते दु:ख सहनच होत नाही. जगण्यात ज्या वेदना असतात त्या कमी असतात आणि मरण्यात ज्या वेदना असतात त्या असह्य असतात हे माणूस विसरतो. जगण्यात ज्या वेदना असतात त्यावर उपाय निघू शकतो पण मरण्यात ज्या वेदना असतात त्यावर कधीच उपाय निघू शकत नाही.

माणसाला जीवन हे एकदाच मिळालेलं असतं. त्या जीवनाचं सोनं कसं करता येईल हे ज्याचे त्यानेच ठरवावे. कारण आपल्याला जीवन हे एकदाच मिळालेलं असतं. जीवनात आपल्याला खूप काही करण्याजोगं असतं पण आपलं तिकडे लक्ष नसतं. कोणी नावं ठेवलं म्हणून जीवन जगणं सोडायचं नसतं. आपले चांगले काम आपण करत जायचे असते. लोकं नावे ठेवून दुसऱ्यांचे जीवन खराब करत असतात. पण कोणी पाय ओढले म्हणून आपण परतायचं नसते त्यावेळी आपले सामर्थ्य दाखवायचं असतं. या जीवनात आपल्याला अपयश आले म्हणून खचून न जाता आपल्या

जिद्दीच्या बळावर आपलं जीवन सार्थक करायचं असतं. आपल्या जीवनात अनेक संकटे येत असतात. आपण त्या संकटांना न घाबरता त्या संकटांना सामोरे गेलो तर जीवन खूप सुंदर बनून जाईल आणि आपले जीवन सार्थक होईल. कष्ट केल्याशिवाय जसे आपल्याला पैसा मिळत नाही. तसे जीवनात अनेक संकटे झेलल्याशिवाय आपल्याला खऱ्या सुखाची किंमत कळत नाही. ज्यांना सुखाची किंमत कळते ते या जीवनात यशस्वी होतात. आणि त्यांचेच जीवन सार्थक बनते. आणि ज्यांना सुखाची किंमत कळत नाही ते जीवनात कधीच यशस्वी होत नाही. दुसऱ्यांसाठी जीवन जगणे यातच मोठे सुख असते.

महात्मा गांधीजींनी आपले संपूर्ण जीवन भारतीय लोकांना स्वातंत्र्य मिळविण्यासाठी घालवलं. त्यांना इतरांच्या सुखात आपले सुख दिसत होते. त्यामुळे त्यांचे जीवन खूप सुंदर बनून गेले. आपले जीवन आपण कसे जगावे हे आपणच ठरवावे. जीवन हे खूप सुंदर आहे. जीवन जगले तर खूप सुंदर बनून जाईल. जीवन हे एक स्वर्ग आहे. जीवन हे चांगल्यापरीनं जगता येते आणि जर जीवन चांगल्यापरीनं जगता आले नाही तर ते जीवन नरकापेक्षाही वाईट असते. जीवन हा एक रस्ता आहे. त्या रस्त्यावर चालत असताना आपल्याला अनेक व्यक्ती भेटतात. या जीवनाच्या वाटेवर फारच थोडी लोक साथ देणारी असतात पण मात करणारी लोक अनेक असतात. जीवन म्हणजे एक रस्ता. या रस्त्यावरून आपल्याला एकटेच चालावं लागतं कारण जी लोकं आपल्या स्वत:चाच विचार करत असतात, आपल्या

सुखाचा विचार करत असतात ती दुसऱ्यांच्या दु:खाचा विचार कधीच करत नाहीत. त्यामुळे आपले दु:ख आपल्यालाच दूर करावे लागते. आणि आपले जीवन आपल्याला एकटच जगावं लागतं. ज्याप्रमाणे आपण जगात येताना एकटेच असतो आणि जगातून जातानाही एकटेच असतो. त्याप्रमाणे आपले जीवन जगण्याचा अधिकार हा आपल्या एकट्याचा असतो.

समीर यरोळकर

# गांधारी ग,

गांधारी ग,

कसं मॅनेज केलंस स्वत:ला?

संयमाचा इतका कडेलोट

जगण्यातल्या प्रत्येक क्षणात असतांना?

पण ही निवड तुझी स्वत:ची नसावीच

कारण तुझ्या हातात असतं तर,

डोळस पर्यायाचं भवितव्यच कोणतीही आई निवडेल खात्रीनं..

आणि मग अविचाराच्या रस्त्याने गेलेला इतिहास बदलला असता अगं,

विकलांग फक्त शरीर नाही तर मन, बुद्धी आणि आत्माही

सहजीवनातली अनेक सत्यं खरंतर सोबतीशिवाय कोणालाही उमगत नाही.

आणि मग तू जे केलंस, ती मात्र तुझीच निवड होती

विद्रोहाची दाहक ठिणगी तुझ्या जगण्यात सोबत होती.

केलास आयुष्याचा सतत यज्ञ

अखंड धगधगणारी संपूर्ण साधना

येत्या जात्या क्षणांमधल न थांबणार वादळ-वणवा.

बंद ओठांआड संचीत पेलतांना

डोळ्यावरची पट्टीच सुरक्षित वाटली तुला

पण सांग ना..

आतून उसळणारे अनंत प्रवाह

जीवघेणे भोवरे होऊन

तुझंच अस्तित्व गिळून घेत होते

तेव्हा कसं ग सावरलंस तू स्वत:ला?

मला माहीत आहे,

कदाचित नाहीच आलं तुलाही सावरता

आणि म्हणूनच आमच्या प्रत्येकीच्या मनात

आजही एक गांधारी आहे कुठेतरी

संयमित ओठांनी, मनातल्या मनात धुमसत

स्वीकारलेली वेदना साहते आहे.

आणि गांधारी ग,

प्रत्येकीला एकदातरी लख्खपणे समजतेस तू

आणि तुझी संवेदना

चिरंतन प्रवाही आहे अजूनही तुझी विद्रोह वेदना!

**-अनन्या**



# अभियंता पण कारकून

नमस्कार मित्रांनो,

लेखाचे नाव थोडे विचित्र वाटते ना? पण सत्य तेच आहे.

नुकताच दहावी आणि बारावीचा निकाल लागला, ९०% वरील अनेकांच्या मुलाखती टीव्ही वर बघितल्या, प्रत्येकाला अभियांत्रीकी किंवा वैद्यकीय शिक्षण घ्यायचे आहे. पण एका गोष्टीचे वाईट पण वाटले मी बघितलेल्या २०-२५ मुलाखतीमधील एकाने पण मला उद्योजक व्हायचे आहे असे म्हटले नाही...

आज महाराष्ट्रात वर्षाला १० नवीन अभियांत्रिकी महाविद्यालये तयार होत आहेत, दरवर्षी लाखो अभियंते शिक्षण पूर्ण करत आहेत. पण एक प्रश्न प्रत्येक अभियंत्याने स्वतःला विचारावा काय तो खरच अभियंता आहे?

की फक्त अभियांत्रिकीचे शिक्षण घेतले, एक मस्त नोकरी लागली .. म्हणजे मी अभियंता आहे?

भारतातून लोह खनिज निर्यात होते आणि स्टील आयात होते, म्हणजे आपण कच्चा माल विकतो आणि दम दुप्पट दराने तयार माल विकत घेतो. हेच अभियांत्रीकी क्षेत्रात पण होते.

आज देशात लाखो संगणक अभियंते आहेत, जे विदेशी कंपन्यांसाठी नोकऱ्या करतात आणि याच विदेशी कंपन्यांनी बनवलेले सॉफ्टवेअर आपण पुन्हा आपल्या देशात आयात करतो.

नोकरी करणे वाईट आहे असे माझे मत नाही... आणि सर्वांनी व्यवसाय करावा असा हट्ट पण नाही.

पण देवाने दिलेल्या दोन हाताने नोकरी करायची की नोकऱ्या वाटायच्या हे ज्याचे त्याने ठरवावे.

अनेकदा आपण उदाहरण सांगतो... पेट्रोल पंपावर काम करणारे धिरूभाई ...कसे करोडपती झाले, तर ऑफिसेस मध्ये टेलीफोन पुसणारे डी.एस.कुलकर्णी कसे उद्योजक झाले.

हे दोघेच नाही असे हजारो आहेत... पण लाखो नाही...

कारण आपण स्वतःला एक संधीच देत नाही, प्रत्येकाच्या मनात एक स्वप्न असते, पण इतरांची स्वप्न पूर्ण करताना आपण स्वतःचे स्वप्न विसरतो.

अभियंते हे फक्त सेवा पुरवण्याचे किंवा व्यवस्थापनाचे काम करू लागले तर नवनिर्माण कोणी करायचे....
की परदेशी कंपन्यांना सेवा पुरवण्यासाठीच

# Happy Diwali




May Millions Of Lamps Illuminate Ur Life
With Endless Joy, Prosperity,
Health & Wealth Forever
Wishing U And Ur Family A Very
"Happy Diwali"



**Mr. Prashant Vedak**
(Curator of Arts and Exhibitions)
Get in touch on WhatsApp for quick registration +91 7738835999
artembassy.in@gmail.com

आम्ही अभियंते होतो...? हा विचार प्रत्येक अभियंत्याने केला पाहिजे...

प्रत्येकाचा उद्योग अगदी अंबानि सारखा मोठा होईलच असे नाही, पण जे कराल ते खूपच सुंदर असेल, सकाळी नोकरीला जाताना स्वतःला फक्त एक प्रश्न विचारा, मी का जातोय, मी खरच खुश आहे?

उत्तर जर होय असेल तर खुशीत नोकरीला जा, पण उत्तर नाही मिळाले तर समजा बदलाची वेळ जवळ आली आहे.

तुमच्या मेहनतीचा फायदा फक्त तुम्हाला झाला पाहिजे, तुमच्या बॉस ला किंवा कोणत्या विदेशी कंपनीला नाही.

आज अनेक अभियंते वर्षानुवर्षे एकच काम करत आहेत, त्यात त्यांनी खूप प्रावीण्य संपादन केले आहे, पण त्याचा त्यांना पगार वाढण्याशिवाय दूसरा कोणताच फायदा झालेला नाही.

ते फक्त त्यांच्या बॉस च्या हाताखालील कारकून होऊन राहिले, आठवड्यातून एकदा एक्सेल मध्ये स्टेटस देणारे, कॉपी पेस्ट करत डॉक्युमेंट बनवणारे, आणि प्रोग्राम मधली एरर पण गुगल वर शोधणारे कारकून.

अभियंता हा निर्माणकर्ता असतो...निर्माण हे त्याच्या नसा नसात असायला हवा..

विचार तुम्हाला करायचाय तुम्ही अभियंते आहात की कारकून?

महाराष्ट्रा मध्ये एकूण १५० च्या आसपास अभियांत्रिकी महाविद्यालये आहेत...त्यात एकूण ५०,००० विद्यार्थी शिक्षण घेतात..म्हणजे दरवर्षी एकट्या महाराष्ट्रातून ५०,००० अभियांत्रिकी शिक्षण पूर्ण करून बाहेर पडतात...
तर संपूर्ण भारतातील हा आकडा ५ लाखांच्या आसपास आहे...
एवढे अभियांत्रिकी असून सुद्धा... भारत देश हा फक्त सेवा क्षेत्रातच अग्रेसर आहे...?? याचा थोडा विचार केला तर समजते...
या ५ लाख अभियांत्रीकांपैकी ४०% म्हणजेच २ लाख अभियांत्रिकी हे व्यवस्थापनाचे शिक्षण घेतात...१५% अभियंते हे अभियांत्रिकी मध्ये मास्टर्स करतात.. ५ % अभियंते हे अध्यापन क्षेत्रात प्रवेश करतात.. ५% पुढील शिक्षणासाठी परदेशी जातात.. २५% अभियंत्यांना दरवर्षी नोकरया मिळतात...तर १०% अभियंते हे नोकरी शोधात असतात..

या वरून हे लक्षात येते की...फक्त ३० ते

४०% विद्यार्थी हे अभियांत्रिकी क्षेत्रात काम करतात....
भारताचा सेवा क्षेत्रामध्ये जगात अग्रक्रम लागतो तो याच कारणामुळे....करणं दरवर्षी भारतात २ लाख किंवा त्यापेक्षाही अधिक सुशिक्षित मनुष्यबळ उपलब्ध असते..
कारण यातील ९०% हून अधिक अभियंते हे फक्त नोकरीच्या शोधात असतात....काहीतरी नवीन करावे...काही नवीन शोधावे...अशी नुसती इच्छा पण यांच्यात नसते...
यात यांचा पण काहीच दोष नाही...
महाविद्यालयांमध्ये यांना फक्त परीक्षेपुरतच  शिकवले जाते..

सेवा क्षेत्रामध्ये सर्वाधिक मोठे क्षेत्र हे माहिती व तंत्रज्ञानाचे आहे....यामुळे...अनेक इलेक्ट्रोनिक्स किंवा इलेक्ट्रोनिक्स टेलिकॉम केलेले अभियंते सुद्धा या क्षेत्राकडे वळतात..

खरेतर माहिती व तंत्रज्ञान क्षेत्रापेक्षाही अधिक वाव त्यांना त्यांच्याच क्षेत्रात कार्य करून मिळू शकतो...
अभियंते हे फक्त सेवा पुरवण्याचे किंवा व्यवस्थापनाचे काम करू लागले तर नवनिर्माण कोणी करायचे....
की परदेशी कंपन्यांना सेवा पुरवण्यासाठीच आम्ही अभियंते होतो...? हा विचार प्रत्येक अभियंत्याने केला पाहिजे...

नवनिर्माण म्हणजे काही खूप मोठे आणि अशक्य असे काही काम नाही...
फेसबुक बनवणे हे काही खूप कठीण काम नव्हते...की ही कल्पना पण काही नवीन नव्हती....या आधी पण अशा कल्पना अनेकांना आल्या...
पण ज्यानी ही कल्पना अस्तित्वात उतरवली तोच जिंकला...आज तो सर्वात लहान श्रीमंत उद्योगपती आहे...

भारतीय अभियंत्यांना पण तेवढाच अधिकार आहे...श्रीमंत होण्याचा...स्वतःच्या कल्पना पूर्ण करण्याचा...
यासाठी गरज आहे ती फक्त विश्वासाची...
जे काम आम्ही दुसर्यांसाठी करू शकतो...ते काम स्वतःसाठी पण करूच शकतो...

आज काल तर अनेक अभियंते अभियांत्रिकी करून नंतर व्यवस्थापन करतात...आणि एखाद्या बँकेमध्ये गलेलठ्ठ पगाराची नोकरी मिळवतात..

अशा अभियंत्यांना एकच प्रश्न...जर बँकेमधेच काम करायचे होते तर अभियांत्रिकी पदविका कशासाठी केली..???

असो..

अभियंता हा निर्माणकर्ता असतो...निर्माण हे त्याच्या नसा नसात असायला हवा..

थोडासा शिक्षण व्यवस्थेतील बदल, स्वतःवरील विश्वास आणि नवनिर्माणाचा ध्यास...यामुळेच खरा अभियंता तयार होईल...

स्वप्नील

मराठी ब्लॉग्स.इन
आवाज मराठी माणसाचा

# मराठी भाषेतील सुप्रसिद्ध ब्लॉग्स

मराठीबोली.ईन
केळकर अमोल
मराठी फूड फंडा
हिंडोळे मनाचे
रमेश ठोंबरे
अनुविना
आयडियाची कल्पना
मोसम
चविष्ट जग
बेधुंद मनाच्या लहरी
उमटले मनी
अवकाश
मराठी कथा ब्लॉग
पांथस्थ A wayfarer
रान किडा
साहित्य सागर
माझे विचार
कट्टा ऑनलाइन
किडेगिरी
रणजित पराडकर
चार ओळी तुझ्यासाठी !
अबोलीचे बोल
विनोद नगरी

रे घना
फील द टेक्स्ट
प्राजक्त
मराठी सुमने..
मनातलं थोडसं..
विचार भ्रमंती
लेट नाइट एडिशन
झुंजारमाची
रिमझिम पाऊस
मी ......माझे.....मला
कविता मनातल्या
वेदिक ज्योतिष
सार्थ श्री सकलसंतगाथा
मित्रहो
रमेश झवर
मलंग वारा!!!
मन उधाण वाऱ्याचे..
थोड्याश्या गप्पा
समीर गायकवाड
चित्राक्षरे
तुमच्या आमच्या मनातले
ओंकार गणेशा
गडकोट

# भारतातील सर्वाधिक कमाई करणारे ब्लॉगर्स




मित्रांनो,

ब्लॉग मधून आपले विचार मांडण्या बरोबरच काही उत्पन्न पण मिळवू शकतो हे आता पर्यंत आपल्याला माहित झालेच असेल.

पण हे उत्पन्न किती आणि कोणत्या स्वरुपात मिळते, या विषयी अनेक ब्लॉगर गोंधळलेल्या अवस्थेत असतात.

ब्लॉग मधून आपल्याला अमर्याद उत्पन्न मिळवता येते, अतिशोक्ती नाही, खरे आहे हे.

ब्लॉग हा काही एखाद्या उद्योगापेक्षा कमी नाही, या पासून तुम्ही खरेच अमर्याद उत्त्पन्न मिळवू शकता. पुढे मी भारतातील सर्वाधिक कमी करणाऱ्या ३ ब्लॉगची माहिती देत आहे. यांचे उत्त्पन्न पाहून तुम्हाला माझ्या बोलण्यावर विश्वास बसेल.

### अमित अगरवाल

हे नाव जगातील प्रत्येक ब्लॉगर ला परिचयाचे असेलच, अमित अगरवाल हे भारतातील पहिले प्रोफेशनल ब्लॉगर म्हणून परिचयाचे आहेत. ते २००४ पासून ब्लॉगिंग करतात, त्यांचे नाव भारतातीलच नाही तर जगातील पहिल्या १० ब्लॉगर मध्ये येते. अमित अगरवाल हे भारतातील सर्वच ब्लॉगरसाठी नेहमीच प्रेरणादायी ठरले आहेत. त्यांच्या ब्लॉगचे वैशिष्ठे म्हणजे त्यांच्या ब्लॉगचे नाव आणि ब्लॉग ची URL दोन्ही वेगळे आहेत. ब्लॉग - Digital Inspiration आणि URL - Labnol.org

नाव – अमित अगरवाल
ब्लॉग - Labnol.org
गूगल पेज – ६
Alexa Rank (India) 510
Alexa Rank (World) 3229
विषय – तंत्रज्ञान
दिवसाला वाचक – ८००००
मासिक कमाई – ३०,००,००० रुपये



### हर्ष अगरवाल

मागील काही वर्षांपासून हर्ष आपल्या ब्लॉग मधून अनेक नवीन ब्लॉगर्स न मार्गदर्शन करत आहे. हर्ष ची लिहिण्याची पद्धत अत्यंत सोपी असल्याने अनेक नवीन ब्लॉगर्सना त्याचा फायदा होतो. हर्ष त्याच्या **Shoutmeloud** या ब्लॉग मध्ये ब्लॉगिंग, ब्लॉगिंग मधून अधिक उत्त्पन्न, सर्च इंगीन ओप्टीमायझेशन या विषयांवर लिहितो.

नाव – हर्ष अगरवाल
ब्लॉग - Shoutmeloud.com
गूगल पेज – ३
Alexa Rank (India) 282
Alexa Rank (World) 2700
विषय – ब्लॉगिंग
दिवसाला वाचक – १००००
मासिक कमाई – २५,००,००० रुपये



श्रद्धा शर्मा

श्रद्धा शर्मा या त्यांच्या YourStory या ब्लॉग मध्ये नवनवीन Startup विषयी लिहितात, नवीन उद्योजकांना मार्गदर्शन करण्याचे काम त्यांचा हा ब्लॉग गेली काही वर्षे करत आहे. त्यांच्या ब्लॉगचे वैशिष्ठे म्हणजे आता हा ब्लॉग भारतातील अनेक भाषांमध्ये वाचता येऊ शकतो. प्रसिद्ध उद्योगपती रतन टाटा यांनी या ब्लॉग मध्ये इन्वेस्टमेंट केली आहे.

नाव – श्रद्धा शर्मा
ब्लॉग – YourStory.com
गूगल पेज – ६
Alexa Rank (World) 2278
विषय – स्टार्टअप
दिवसाला वाचक – १००००
मासिक कमाई – २२,००,००० रुपये



वरील सर्व ब्लॉगर्स ची कमाई हि एका महिन्याची आहे, मग आहे ना ब्लॉगिंग एका उद्योगा प्रमाणे.

पुढील वर्षी या यादी मध्ये एखादे मराठी नाव असेल तर मला सर्वाधिक आनंद होईल. मग लागा तयारीला आपले विचार आपल्या ब्लॉगमधून मांडा आणि त्यातून उत्पन्न पण मिळावा. ब्लॉगिंग संदर्भातील कोणत्याही माहितीसाठी आमच्याशी संपर्क करा. social@marathiboli.in



# व पु



व पु, तुमच्या बद्दल कुठून सुरवात करू तेच काळात नाही . परवाच मी बोलता बोलता म्हणाले, कि आयुष्य घडवण्यात , संस्कार करण्यात जितका मोठा वाट आई वडील ,शाळा आणि आपली सोबत असलेल्या मित्र मैत्रिणीचा असतो , तितकाच पुस्तकांचा हि असतो .

तुमची माझी ओळख खूप जुनी आहे , वयाच्या १२-१३ वर्ष पासून ते आज पर्यंत मी तुम्हाला भेटत आली आहे तुमच्या अनेक पुस्तक मधून . मन कधी खचून जावे, उदास व्हावे आणि समोरच मार्ग च अंधारमय वाटावे अन बस एक तुमचे पुस्तक हातात घ्यावे , दृष्टीकोनच बदलून जाईल

वाचन हा माझ्या जीवनाचा अविभाज्य भाग आहे, पण त्यात तुअम्चे एक असे खास स्थान आहे , आयुष्याचा ज्या ताप्पाय्त आपली वैचारिक बैठक तयार होते , त्याच वयात तुम्ही भेटलात आणि मनुष्य स्वभावाचे अनेक पैलू उलगडून दाखवलेत . हे चूक आणि हे बरोबर अशी मापे माणसाना लावता येत नाहीत, तसे ठोकताळे नसतात हे तुम्हीच शिकवलात . एखाद्या गोष्टी कडे नव्याने पाहण्याची दृष्टी तुम्ही दिलीत आणि म्हणूनच स्वच्छ पणे विचार करणे जमू लागले . समोरच्या माणसाला आपले करताना , त्याच्या गुण दोषसकट स्वीकारण्याचे बळ दिलंत आणि स्वतःच्या चुका मान्य करण्याचे हि !!!!

तुमच्या पुस्तकातून अनेक लिक भेटले अंड पार्टनर , श्री , बाबी , सखी , अश्या काही माणसांच्या मी प्रेमातच पडले . दोस्त , ऐक सखे , तप्तपदी, सखी, पार्टनर , हि वाट एकटीची , रंगपंचमी , झोपाळा, माझे माझ्या पाशी, माणसे, कर्मचारी , वलय, वपुर्झा आणि कित्येक सोबत्यांनी मला खूप सारे सोबती दिले .

तुम्ही लेखक म्हणून जीतेका मोठे आहात , तितकेच माणूस म्हणून हि . व पु संगे वडिलांची

कीर्ती आणि रंगपंचमी मधून तुमचे कुटुंबावर आणि सुहृदांवर असलेले प्रेम दिसतेच कि !!!

तुमचे पुस्तक वाचले आणि संपले असे होताच नाही , कारण ते पुस्तक आणि त्यातली माणसे भेटतात आणि त्यातले विचार आणि भावना मनाला भिडतात .

माझ्या छोट्याश्या आयुष्यात जे काही लहान मोठे ल कठीण प्रसंग आले , कधी द्विधा मनस्थिती झाली तेव्हा नक्कीच , आई बाबा आणि माझी बहिण खंबीर पणे पाठीशी उभे राहिले, आणि अलीकडच्या काळात माझा जोडीदार पण आणि त्याच सोबत तुम्ही सुद्धा, प्रत्येक्ष नाही तरी पुस्तक रूपाने . चूक बरोबर , यश अपयश , सुख आणि दुखः हे शब्द एका व्याखेत बसवले कि पोकळ असतात आणि म्हणूच ते एका विचारात न अडकवता , परिस्थिती नुसार सकस आणि निरपेक्ष दृष्टीने प्रश्न सोडवण्याची शिकवण हि तुम्हीच दिलीत . तुम्हाला भेटण्याचा , पाहण्याचा योग कधीच आल नाही , तरी मी भाग्यवान आहे कि मला मराठी येते आणि वाचनाची आवड आहे . म्हणूनच तुम्ही भेटलात . अजूनही , परत परत वाचून हि , तुम्ही नव्याने भेटता आणि एक नवा विचार देवून जाता .

आज मी हे आनंदाने सांगू शकते कि, तुमची पुस्तके हि केवळ माझ्या शोकेस चा भाग नसून , माझ्या आयुष्याचा , विचारांचा एक भाग आहात . हे नाते आता एक वाचक आणि एक लेखक नसून , कदाचित त्या पलीकडचे आहे , इतके तुम्ही जवळचे वाटता कारण तुमच्या कथा ह्या आमच्या सारख्या सामान्य माणसांच्या असतात , आणि म्हणूच तुम्ही असामान्य आहात

पार्टनर चे वलय मनाला छेदून गेले

अन सखीची आत्मीयता , पाणपोई सरखी तहान भागवून गेले

बाबी नि एकटे चालता चालता , आय्श्याच्या : "ठिकऱ्या" जोडायल शिकवले

रंगपंचमी नि अनेक रंगाची उधळण केली अन वपुर्झा नि विचारांचा महोत्सव केला

तुमचा गुलमोहोर , आयुष्य प्रेममायी करून गेला तप्तपदी नि माझी सप्तपदी अधिक सुख कर केली

दोस्त नि दोस्ती शिकले आणि माणसे यांनी माणुसकी शिकवली

झोपाळा विचारांच्या हिंदोळ्या वरून खूप काही देवून गेला

खूप दिलंत तरी ओंजळी आमची रिती अशी

लिहावे तितके थोडे , शब्दांची सांगड आणि घालू कशी

तुमची कृतज्ञ , एक वाचक

शीतल

# एक आठवण भिम बाबा तुमची...

आजही क्षणाक्षणाला येते
आठवण भीम बाबा तुमची
किर्ती तुमची पाहता या जगी
मान उंचावते आम्हा सा-यांची

जेव्हा झाला नव्हता जन्म
या भूमी भीम बाबा तुमचा
तेव्हा आम्हा लोकांवर
बोजा होता फक्त हाल अपेष्टांचा

बाबा जन्म घेऊनी या जगी
नवा इतिहास गेलात लिहूनी
महती ही विश्वातील तुमची
लिहावी वाटते सुवर्ण अक्षरांनी

शिक्षण घेतलं भीम बाबा तुम्ही
वर्गाच्या बाहेर बसूनी
किती हाल सहन केलेत आम्हासाठी
रस्त्याच्या दिव्याखाली अभ्यास करुनी

नव्हता या जगी आम्हा
माणूस म्हणून जगायला थारा
पण आज तुमच्या मुळेच बाबा
देश ओळखतोय आम्हा सारा

माणूस असूनही आम्हा
माणसाचं स्थान नव्हतं
उच्च -नीच्च तेच्या बंधनात
मन आमचं खचलं होतं



तुम्हीच तर बाबा सा-यांना
माणूसकी म्हणजे काय शिकवलंत
आणि या देशाचं संविधान लिहून
माणसाला माणूस म्हणून घडवलंत

आज पाहतोय आम्ही हे सारं जग
तुमचाच जयघोष करतंय
म्हणून तर बाबा गर्वानं आमचं
मन आज उंचावतंय

बाबा आमच्यासाठीच तुम्ही
खुलं केलंत चवदार तळं
काळाराम मंदिरात ही चालू केलंत t
गर्वानं आमचं येणं-जाणं

तुम्हीच तर केलात बुध्दांच्या
दया, क्षमा ,शांतीचा स्वीकार t
आणि यामुळेच आलाय बाबा
आमच्या ख-या जीवनाला आकार

कवी- कु. चंद्रसेन सिध्दार्थ जाधव .
मो. ८४२२०५४०३९

# दिपावली : अभ्यंग स्नानाचे महत्व



दिवाळी आली कि आपल्या सगळ्यांना फराळाचे वेगवेगळे पदार्थ, सकाळी आई च्या हाताने उटणे व तेल लाऊन गरम पाण्याने आंघोळ, सगळीकडे दिव्यांचा प्रकाश, फटाके फोडण्याचा आनंद इ. सगळ्या गोष्टी आठऊ लागतात.

सुवासिक उटणे व तेल लाऊन आंघोळ का करावी? याला उद्वर्तन व अभ्यंग स्नान असे म्हणतात.

**उद्वर्तन: उद्वर्तनं कफहरं मेदसः प्रविलापनम् ।**

**स्थिरीकरणम् अंगानाम् त्वकप्रसादकरं परम् ॥**

अंगास उटणे लावण्याने शरिरात वाढलेला अतिरिक्त मेद व कफ कमी होतो. शरिर दृढ बनते. त्वचा स्वच्छ होवून तीचा वर्ण उजळतो.

**अभ्यंग : " अभ्यंगम् आचरयेत् नित्यं स जरा श्रम वातहा ।**

**दृष्टी प्रसाद पुष्टी आयु स्वप्नसु त्वक्त्वदाढर्यकृत् ॥"**

अभ्यंग म्हणजे सकाळी अंघोळीच्या आधी कोमट तिळाच्या तेलाने संपूर्ण अंगास मालीश करणे होय. अभ्यंग हा रोज करण्यास सांगितला आहे. आजकाल मार्केट मधे विविध अभ्यंग तेल मिळतात, ते वापरले तरी चालते. रोज अभ्यंग स्नान केल्याने लवकर म्हातारपण येत नाही (म्हणजे त्वचेवर सुरूकुत्या पडणे इ लक्षणे दिसत नाहित), थकवा

जातो, वातदोष शरिरात वाढत नाही. दृष्टी प्रसादन करतो (म्हणजे नजर स्वच्छ रहाते, लवकर चष्मा लागत नाही, डोळ्यांना कमजोरी येत नाही), शरिराची पुष्टी होते (सप्त धातूंचे बल वाढू लागते), आयुष्य वाढते, झोप छान लागते (निद्रानाशाचा त्रास कमी होतो), त्वचा चांगली बनून शरिर दृढ बनते.

मुख्यतः अभ्यंग डोके, पाय व कानांच्या ठिकाणी नेहमी करावे.

ज्यांना कफविकार (सर्दी इ.) झाले आहेत, सध्या पंचकर्म सुरू आहे किंवा करून घेतले आहे, अजिर्ण झालेले आहे अशांनी अभ्यंग करू नये.


डॉ. पोर्णिमा काळे.

(आयुर्वेदाचार्य) शिवसमर्थ आयुर्वेद क्लिनिक, पुणे.

Kale360@gmail.com

# आभार

मराठीबोलीच्या पहिल्या दिवाळी अंकाला आपण दिलेल्या प्रतिसादा पद्धल सर्व वाचकांचे आभार.

मराठीबोलीच्या सर्व लेखक आणि कवींचे आभार.

मराठीबोलीच्या १५००० सभासदांचे आभार.

मराठी बोली.कॉम
आवाज मराठी माणसाचा

मराठी बोली.इन
आवाज मराठी माणसाचा

मराठी ब्लॉगर्स.इन
आवाज मराठी माणसाचा

